# विश्रांति

( कथासंग्रह )

लेखक :—

प्रो. भा. म. गोरे, एम्. ए.



१९४२

प्रो. भा. म. गोरे, एम्. ए. यांचें

## वाङ्मय

(१) नवी पालवी [ 'लघुतम–कथा' संग्रह ]

(२) आधुनिक आङ्ग्ल वाङ्मय [ टीका ]

(३) विद्या–विनोद [ शैक्षणिक कादंबरी ]

(४) नवें निशाण [ प्रातिनिधिक 'लघुतम कथा' संग्रह ( संपादित ) ]

(५) *Writings and speeches of Dr. R P Paranjapye* ( संपादित )

(६) विश्रांति [ कथासंग्रह ]

## आगामी

(१) सोन्याचे कण [ लघुतम–कथा संग्रह ]

(२) नीलरेखा [ लघुनिबंध संग्रह ]

'विश्रांति' या कथासंग्रहाच्या प्रथमावृत्तीचे हक्क प्रकाशक–श्री. दा. ना. मोघे, बी. ए., प्रोप्रा. स्कूल ॲन्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर याजकडे असून पुनर्मुद्रणाचे व पुढील आवृत्तीचे हक्क लेखकाकडे आहेत

मुद्रकः –बा. ना. ठकार, श्रीसिद्धेश्वर प्रिंटिंग प्रेस, कोल्हापूर.

# प्रस्तावना

माझे स्नेही प्रा भा. म गोरे, याचा 'विश्राति' हा कथासग्रह वाचून पाहिला प्रा गोरे यानीं या कथासग्रहास मला थोडे प्रास्ताविक लिहिण्याबद्दल विचारलें मी आनदाने 'हो' म्हटलें प्रा भा म गोरे याच्याविषयीं माझें मत चागलें आहे

माझ्या प्रकाशनाच्या धद्यामुळें माझें वाचन अगदीं नाहीं म्हण ण्याइतकें थोडें होतें त्यामुळे प्रा गोरे याचे वाङ्मय ह्या वेळेपर्यंत मी फारसें वाचलेले नाहीं हेंहि त्याच्याबद्दल माझे मत चागल असण्याचें कारण असेल कदाचित् माझे पुष्कळ साहित्यसेवक स्नेही आहेत. आणि नियम म्हणून नव्हे, पण आम्ही एकमेकाच वाङ्मय फार कमी वाचतों. पण त्याचा फायदा एक मात्र होतो कीं आमचे कित्येक सभाव्य मतभेद टळतात आणि आमच्या मैत्रीच्या चिरस्थायीपणाबद्दल आम्हाला कधींच शका वाटत नाहीं!

—आणि याचें एक प्रमुख कारण आहे स्तुतीला माझी जिव्हा जात्याच जड आहे माझ्या काहीं साहित्यिक मित्राबद्दल युगप्रवर्तक—क्रातिवादी वगैरे वगैरे असल्याचा बराच गवगवा आहे, पण मी त्याकडे जाणून बुजून दुर्लक्ष करतों

—पण माझे स्नेही प्रा गोरे याच्याबद्दल तसा काहींच गवगवा माझ्या कानीं नसल्यामुळें मी त्याचा 'विश्रांति' हा कथासग्रह वाचून पहायचें ठरविलें आणि प्रास्ताविक लिहिण्याचें कबूल केलें. या कथा-सग्रहाचें नावच मुळीं 'विश्राति' आहे म्हटल निदान लेखकाची अपेक्षा तरी फार नाहीं आणि हा गुण मला फार मोठा वाटतो.

'विश्राति' या कथासग्रहात 'सतीचे वाण' या नावाची एक कथा आहे. त्यात खालील वाक्यें मला आढळलीं

" होय, आनद नसला—तरी मीही कर्तव्य पालनाचें समाधान भोगतों आहे अध्यापकाचा पेशा म्हणजे सतीचें वाण आहे त्याला वैयक्तिक परिस्थितीचे अपवाद मजूर नाहींत एकदा या अपवादाच्या पळवाटा शोधू लागलें म्हणजे सारे नियमच कवडीमोल होतात त्यापेक्षां या कठोर नियमांमुळें एखाद्याला झालेलें दुःखहि त्यानें समष्टीच्या हिताकडे पाहून शातपणें सोसायला हव इतर व्यवसायांतल्या आपद्धर्माच्या सवलतीचा फायदा ध्येयवादी म्हणून जगात मानान मिरवणाऱ्यांनीं घेता कामा नये ' परिस्थिति कशीहि असो—"

असे विचार बोलण्याचें धाडस क्वचितच करतात आणि शिवाय स्वतः लेखकहि एक अध्यापकच आहेत यावरून ते ' कलेकरिता कला ' या कलकलाटाचे भोक्ते दिसत नाहींत—तर कला आणि नीति . ...

मांजरीचीं पिलें ही या कथासग्रहातील शेवटची गोष्ट आहे. आपापल्या सुदर कथानायिकाच्या भावनाबरोबर हेलकावे घेणारे आणि त्याच्याकरिता तन्मयतेनें विव्हळणारे मराठीमध्ये आज कितीतरी लेखक जीव आहेत पण ' माजरीचीं पिले ' या कथेंत प्रा भा म गोरे हे एका किडकिडीत माजरीच्या आयुष्याशीं, आणि तिच्या दोन चिमण्या पोराच्या जीवनाशीं किती तन्मय झाले आहेत हें पहाण्यासारखें आहे ' हृदय ' का काय म्हणतात त्याच्यावरहि या गोष्टीच्या वाचनानें परिणाम होतो.

नतर पहिली गोष्ट ' चपक स्टोअर्स ' एक चागली गोष्ट आहे. शेवटीं लग्नाचा ठराविकपणा त्यात असला तरीहि गोष्ट चागली आहे. आणि त्यात लघुकथा तत्राचाहि मागोवा लागतो

ब्रॅडमनचा बाप ही एक आल्हादकारक कथा आहे खरें प्रेमहि एखाद्यावेळीं माणसाला कसें कार्यक्षम आणि खेळाडू बनवतें, ह्याचें या कथेंत चागलें चित्रण केलें आहे पण प्रेमाचा कार्यभाग झाल्यानतर नायकाच्या मनोवृत्ति स्थिरावतात. यावरून प्रेमाच्या गलोलानें ध्येयाची शिकार करण्याच्या वाङ्मयीन मनोवृत्तीवर–कदाचित् लेखकाच्या अनिच्छेनेंसुद्धा चागलाच प्रकाश पडला आहे.

प्रेमाचीं लेणी ही एक विडीवालीची प्रेमकथा आहे ! आणि त्यातहि ढोंग अजिबात नाहीं म्हणण्याइतकें कमी आहे. समाजाच्य

खालच्या थरातील पात्रे घेतलीं तरी तीं सुशिक्षित कोट्या करीत रंगविण्याची ढब मराठी वाङ्मयात पडली आहे—पण या कथेंतील विडीवाली ही खरी विडीवालीच आहे !—आणि त्या विडीवालीचें स्वभावचित्रणहि अंत:करणाला भिडणारें आहे

दूरचे डोंगर—मराठी वाङ्मयाचे धंद्याच्या दृष्टीनें काय मोजमाप आहे याची काहींशी हृदयभेदी सत्यकथाच 'दूरचे डोंगर' या कथेंत वर्णिली आहे असे म्हणायला हरकत नाहीं ! मराठी वाङ्मयात चालू असलेल्या वरंल स्तुतीने कित्येक तरुणांच्या आयुष्याचे होम झालेले आहेत हें मला माहीत आहे त्यामुळें 'दूरचे डोंगर' या कथेंतील चित्रण जरी कटू वाटले तरी तरुण आणि होतकरू लेखकांनीं आपल्या वाङ्मयसेवेपूर्वीं ही कथा लक्षपूर्वक वाचली पाहिजे वारेमाप स्तुतीनें चालू नोकरी—धंद्यावर पाणी सोडणारे या कथेंतील नायकाप्रमाणे कित्येक हुरळणारे तरुण सापडतील—पण अशा तरुणांना पश्चात्ताप झाल्यानंतर पुन्हा नोकरीवर ठेवणारे धंदेवाले क्वचितच सापडतील

विजेचा पाळणा ही गोष्ट वाचताना जरी नाविन्यपूर्ण वाटली तरी ठराविक साच्याची आहे आणि इतकें वाङ्मय लिहून झाल्यानंतर संपूर्ण नाविन्य महागच राहणार !

सतीचे वाण या गोष्टीचा प्रारंभीच उल्लेख केला आहे. ही गोष्ट फारच चांगली आहे पण या कथेंतील संवाद कित्येक ठिकाणीं व्याख्यानासारखे झाल्याचे वाटले

कलावंत या कथेंत फारच स्वारस्य आहे. या गोष्टीवरून 'वासुदेवाच्या पेल्याची' मला आठवण झाली, पण ती उलट्या अर्थानें. 'वासुदेवाच्या पेल्यात' कृष्णाच्या पायाला पाणी लागलें कीं तो पेला जसा रिकामा होतो, त्याप्रमाणें कलेला जर नीतीच्या मर्यादा नसतील तर कलेचे कलालच जास्त निर्माण होतील हें हृदयभेदक सत्य 'कलावंत' या कथेंत सांगितले आहे

'विश्रांति' या कथासंग्रहातील गोष्टीवर परीक्षेची प्रश्नपत्रिका सोडवावी त्या तऱ्हेनें मला काय वाटलें तें लिहिलें आहे अर्थात् यातहि

मतभेदाला जागा आहे आणि असलें लेखन हीच जर प्रा भा म गोरे याची विश्रांति असेल तर त्याचें मी अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों

माणूस कुठें हसतो यावरून जशी त्याच्या मनाची संस्कृति कळते, त्याप्रमाणें माणसाला ' विश्रांति ' कुठें वाटते त्यावरून माणसाची दानत कळते. आणि त्या दृष्टीनें ही ' विश्रांति ' अभिनंदनीय आहे

—आणि त्या दृष्टीने ' विश्रांति ' या कथासंग्रहास मी शंभरा पैकीं ५५ मार्क सहज देईन आणि तेंच उत्तर बरोबर आहे असें मला वाटतें कारण हा जर शंभर मार्कांचा प्रयत्न आहे असे जर प्रा गोरे यासच वाटलें असतें तर ते माझ्या सारख्याकडे मतास आलेच नसते !

—आपल्या विश्रांतीची कल्पना इतकी सात्त्विक ठेवल्याबद्दल माझे स्नेही प्रा. भा. म. गोरे यांचे अभिनंदन करून हे प्रास्ताविक आटोपते घेतों

पुणें
ता. १७।२।४२

—यशवंत गोपाळ जोशी.

---

# प्रारंभीं

आज माझ्या आठ लघुकथांचा हा संग्रह मराठी रसिकांच्या सेवेस सादर करतांना मला अत्यंत समाधान वाटत आहे १९३५ पासून लिहिलेल्या कथांतून निवड करून हा छोटासा संग्रह मी तयार केला आहे

आजच्या युद्धजन्य परिस्थितीमुळें कागद छपाईचे भाव कडकलेले व वाचकांची क्रयशक्तीहि भारावलेली—यामुळें कथा व पृष्ठांच्या संख्येला निर्बंध घालावा लागला—एका दृष्टीनें मी ही इष्टापत्तीच समजतों, कारण यामुळें थोडे तरी वैशिष्टय असलेल्या व स्थळ, प्रसंग, व्यक्ति यांत नाविन्य असलेल्या कथाच निवडून काढणें भाग पडलें

महाराष्ट्रीय पांढरपेशा समाजांतील संकुचित थरातल्या सुशिक्षित व नोकरीपेशाच्या स्त्री-पुरुषांच्या हालचालीभोंवतीच फिरणाऱ्या, त्या पलीकडील भिन्न जातीय, भिन्न वर्गीय जीवनाची दखलहि न घेणाऱ्या प्रेमकथांना आतां वाचक विटत चालले आहेत असें अनेक वेळीं सांगण्यांत येतें अशी तक्रार करणें सोपें असलें तरी तिचें निरसन करणे फार कठीण असतें याची मला पूर्ण जाणीव आहे. हें निरसन यशस्वी रीतीनें व्हावयाचें असल्यास त्यासाठीं मजहून कर्तृत्ववान् व प्रतिभाशाली लेखकांनीं इकडे अधिकाधिक लक्ष पुरवावयास पाहिजे. माझ्यापुरतें बोलावयाचें म्हणजे, 'लघुतम-कथे' सारख्या नव्या कथाप्रकारास वाहून घेऊन व या संग्रहातील पद्धतीच्या कांहीं कथा लिहून मी या दिशेनें दोन चुकतीं पाउलें टाकीत आहें योग्य मार्गदर्शन करणें थोर आणि अधिकारी प्रतिभावंतांच्या हातीं आहे. असो

माझ्या विनंतीला मान देऊन, महाराष्ट्राचे आवडते कथालेखक श्री. य गो. जोशी यांनीं आपल्या आस्थापूर्ण, मार्मिक आणि स्पष्टवादी

लेखन पद्धतीनें या सग्रहाला प्रस्तावना लिहून दिली यासाठीं मी त्याचा आभारी आहे श्री यशवतराव जोशी याची सडेतोड आणि निर्भीड विचारसरणी, निस्पृह बाण्यामुळे कोणाचीहि मुर्वत न ठेवता कटु सत्य सागण्याचा त्याचा लौकिक हे विशेष लक्षात ठेवूनच मी त्याना हे दोन शब्द लिहिण्याची विनति केली त्याच्या न्यायनिष्ठुर आणि चोखदळ वृत्तीलाहि हा सग्रह बऱ्याच अशानें उतरला आणि शभरापैकीं पचावन गुण त्यानीं पूर्ण विचार करून बहाल केले यामुळ हा सग्रह पुढे ठेवताना मला थोडा अधिक धीर येत आहे "बनचुके" पणाची वृत्ति मी कधींच अगीं ठेवली नसल्यानें यापुढे कितीतरी तयारी करावयाची आहे याची मनाशीं खूणगाठ मला बाधता आली, याबद्दल मी श्री जोशी याचा अत्यत आभारी आहे मजल फारशी झाली नसली तरी प्रवासाची दिशा तरी बरोबर आहे ही जाणीव काय कमी महत्वाची असते !

व्यासग आणि व्यवसायाच्या दगदगींतून मिळालेल्या 'विश्राती'च्या क्षणात, विरगुळा म्हणून या कथा लिहिल्या गेल्या वाचकानींहि 'विश्राति'च्या अवकाशात त्या वाचून पहाव्यात अशा विनति आहे. धकाधकीच्या जीवनानें शिणलेल्या, विटलेल्या मनाना या कथानीं अल्प काळ तरी खऱ्या 'विश्राती'चा तकवा मिळाला तरी माझी बिदागी पावली असें मी समजेन

फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४.
१८–२–१९४२

भा म गोरे.

# १ : चंपक स्टोअर्स

hopeless

—या नव्या सोनेरी पाटीवरची झेंडूची माळ नीट करून मी बारा वाजता दुकानाची फळी लावून घेतली, आणि जेवणासाठीं वर गेलों.

आजच सुमुहुर्तावर मी हें कापडाचें दुकान उघडले होतें माझ्या आळींतल्या, शेजारींच दुकानें असलेल्या दोन व्यापारी मित्राना परिचयासाठीं दुपारच्या निवात वेळीं मी चहाला बोलाविलें होतें जेवण झाल्यावर माडीवरच्या खिडकींतून, दुकानावरून जाणाऱ्या लोकाकडे मी कुतूहलानें पाहत होतों 'चपक स्टोअर्स' हें जरा चमत्कारिक नाव पाहून येणारे जाणारे स्वभावाप्रमाणें पुटपुटत होते—

"काय काय नवीं नाव देतात हल्लीं दुकानाला बोवा!"

—"ह घ्या! आणखी एक दुकान, आमचा धदा बसवा एकदा पुरता"

—"ठीक झाल, या कोपऱ्याला एक दुकान हवच होत बर का!"

—"अग ए! हें नव दुकान पाहिलस का— काय नाव म्हणे 'चपक!' हॅ–हॅ–"

—"अय्या! नव कापडाच दुकान दिसतयू, नव्या तऱ्हा पाहायला यायच ग गडे इकडे"

—"एऽऽ! काय थाट आहे लेकाच्याचा! बी. ए. झालेला आहे कोणी म्हणे, सहा महिन्यात ही थाटान लावलेली पाटी उलटी न करीन तर नाव दुसर!"

—“ अहो, काहींतरी गोम आहे, ऐकतों, काहीं भलती भानगड आहे म्हणे या दुकानाच्या मालकाची . ”

भल्याबुऱ्या स्वभावाप्रमाणें काढलेले हे उद्गार ऐकत पाहुणे येई-पर्यंत मी खिडकीशीं बसलों होतों.

दोनच्या ठोक्याला ते आले अलीकडील स्टेशनरी स्टोअरचे मालक भाऊसाहेब हे एक तरुण उत्साही आणि आनंदी प्राणी दिसले धड्धड् जिन्यावरून दोन दोन पायऱ्यावर उड्या मारीतच ते वर आले, आणि बैठकींतलीं चित्रांचीं कॅलेंडरें आणि फोटो पाहत फिरू लागले पलीकडच्या किराणा दुकानाचे मालक नानासाहेब हे एक वृद्ध गृहस्थ असून, मुद्रे-वरून शांत, सुस्वभावी दिसत आल्याबरोबर लोडाशीं हुश्श म्हणून टेंकून त्यानीं तबकातल्या सुपारी आणि अडकित्त्याचा ताबा घेतला त्याचें स्वागत करून मी फराळाच्या बशा आणण्यासाठीं आत गेलों

फराळ चालू असता भाऊसाहेबाचे धंद्याबद्दल बोलणे चाललें होतें. मधेंच उसळून ते म्हणाले—

‘ या गुजराथ्यानीं आपला धंदा मारला सगळा ! कुठून कुठून येतात भणंग भिकाऱ्यासारखे, अन् लटपटी खटपटी करून, नोकर म्हणून शिरले कीं मालक बनून निघतात दुकानातून ”

नानासाहेबानी मात्र सुपारी कातरताना शांतपणें या उसळत्या रक्ताच्या भाऊसाहेबाना उत्तर दिलें — ‘ हें पहा भाऊसाहेब ! तुमच्या या हेव्याच्या उद्गारावरूनच त्याची पात्रता सिद्ध होतेय् वीस वर्षं काढलींत् मीही धंद्यात अन् माझं शेवटीं ठाम मत झालय् कीं महाराष्ट्राच्या बुद्धिमत्तेला गुजरातच्या हिशेबीपणाची आणि व्यापारी डावपेंचाची जोड दिल्याशिवाय यापुढें आपला तरणोपाय नाही. ’

मला हें ऐकून नकळता हसू लोटलें—

—“ हसण्यावारी नेऊ नका ! उथळपट्टी, बिनहिशेबीपणा आणि व्यापारी भल्या बुऱ्या डावपेचाचें अज्ञान याच्यामुळें उत्साहानें या पेशात पडणारे कर्तबगार पण बिगर अनुभवी तरूण निराश होतात, आणि धंद्याच्या नावानें खडे फोडीत पुन्हा नोकरीच्या रस्त्याकडे वळतात.”

—" अगदीं खर आहे, नानासाहेब " मी म्हणालों " माफ करा हं ! माझ्या हसण्याचा उद्देश तुमच्या उपदेशाची चेष्टा करण्याचा नव्हता तुमच्या पहिल्या बोलण्यावरून माझ्या एका मित्राच्या आयुष्याची आठवण झाली मला महाराष्ट्र आणि गुजरात याच्या बुद्धि आणि धूर्ततेच एकीकरण कराव हे तुम्ही योग्यच सागितल, पण आमच्या या मित्रानं हें एकीकरण जरा निराळ्या तऱ्हेन केल होत त्याची आठवण होऊन हसू आल मला—"

—" म्हणजे काय भानगड आहे बुवा ? " भाऊसाहेब उद्गारले ! " काहीं गमतीदार सागा बुवा ! कटाळा आलाय् हाच व्यापाराचा काथ्याकूट करून–ते भाव, अन् उधारी, अन् शिल्लक, वसुली अन् बिल " म्हणून त्यानीं ऐसपैस आळस देऊन, तक्क्यावर आडवं अग टाकून जाभई दिली, आणि ऑर्डर दिली, चहा येउ द्या बुवा लवकर— जड जेवण अन् वर हा फराळ . "

—" ठीक आहे, " मी म्हणालों " थोडक्यात सागतो "

## पांच वर्षांपूर्वीची गोष्ट.

पुण्याच्या मलेरियानें त्रस्त होऊन, डॉक्टरच्या सल्ल्यावरून माझा एक मित्र ( सध्या अविनाश म्हणू आपण त्याला ) — सागली–मिरजच्या कोरड्या हवेचा फायदा घेत होता सागलीच्या कॉलेजात शेवटल बी ए च वर्ष घालवाव आणि आरोग्यही मिळवाव म्हणून त्यानें ही वाकडी वाट केली, आणि " खणभागात " एका वाड्यात खोली घेऊन अभ्यास सुरू केला.

सागलींत अगदींच नवखा असल्यानें त्याला मित्र नव्हतेच माडीवरून दिसणाऱ्या गावच्या गोल तळ्याकडे पाहत बसावें, नाहींतर कटाळा आला म्हणजे हरीपूरच्या वाटेनें, कृष्णातीरानें फिरण्यासाठीं जावें हा त्याचा विरगुळा असे

त्याच्या वाड्याच्या तळमजल्यावर एक लहानसे किराणा मालाचें

दुकान होतें एक म्हातारी गुजराती विधवा बाइ आणि तिची मुलगी चपा या दोघी तें दुकान चालवीत.

रोज सकाळीं ओट्यावर उन्हात बसून " दातण " ( बाभळीची एक काडी ) चावीत त्या मावशीबाई बसलेल्या असायच्या, आणि दुकानातले टिनचे डबे झाडून, चपा सर्व माल नीट करून ठेवीत असायाची दुकान लहानसेंच, पण जवळ दोन गल्ल्यात दुसरे दुकान नाहीं हें पाहून नाक्यावर धोरणानें माडलेलें होते

एका वयस्क विधवा बाईनें अशा तऱ्हेने परमुलुखात स्वतत्र दुकान चालवून, अब्रूनें आणि कोणाचे उपकार न घेता दिवस काढावेत हें पाहून अविनाशला कौतुक वाटे. त्याबरोबरच, नातलगाचे टोमणे खाऊन, अष्टौप्रहर त्याच्या घरीं राबणाऱ्या इकडील मध्यम स्थितींतील दुर्दैवी विधवाची स्थितीही त्याच्या डोळयापुढें उभी राहत असे

भोंवताली सर्व लोक मराठी नाहींतर कानडी बोलणारे त्यामुळें मात्र या मायलेकींना फार चुकल्या चुकल्यासारखें वाटे अविनाशला गुजराती बोलता येते हें त्याना कळल्यानें त्याना साहजीकपणे आनद झाला. रात्रीं जेवण आटपून खोलीकडे जाताना, दुकानामागील मायलेकींच्या एक खोलीच्या ससारात बसावे—दहा पधरा मिनिटे गप्पा माराव्यात, वर्तमान पत्रात वाचलेल्या गुजरात सबधीं बातम्या त्याना सागाव्यात असा त्याचा नेम असे त्यावेळीं मावशीबाई दुकानाची फळी आडवी करून आत माळ फिरवीत, मधून मधून तपकीर ओढीत बसलेल्या असायच्या—चपा स्वयपाकाला लागलली असायची

असाच त्याचा परिचय वाढत गेला.

अविनाश उबऱ्यावर बसून मावशीबाईशीं बोलत असला तरी मधून मधून त्याची नजर पलीकडे जाई. पोळपाटावर पापडासारखे लहान लहान गोल " फुलके " करणारी चपा, आणि लाटण्याबरोबर फिरणारीं तिचीं गोल गोर मनगटें आणि बोटें, याकडे तो भारल्यासारखा पहात राही तिच्या रग आणि बाध्याला गोल गुजराती पद्धतीची साधी ठिप क्यांची साडीही फार शोभून दिसे.

—'केम भाई ?' मावशीबाईनीं एक दिवशीं प्रश्न केला

अविनाशने जरा दचकून, ओशाळून, चपाकडील नजर काढून खालीं पाहिले

—'मी म्हटला, आता तुमी विवाह केवा करेल ?' मावशीबाईनीं मोडक्या मराठींत जरा मिस्किलपणे प्रश्न केला

—त्याच अस आहे मावशीबाई '

—'ते जवा दे (जाउ दे) लई पोरिये माहीती हायते आम्हाला तुमचासारखा विवाहाची बातच बोलते नाय पहिला—' आदीं नोकरी नी मग छोकरी म्हणते—पण आपले जातची एखादी खुपसुरत पोरगी मिळली के मग ये सारे बाता विसरून जाते म्हणून म्हनते आम्ही कीं तुम्ही विवाह केव्हा करल ?'

नकळत अविनाशचे डोळे चपाकडे वळले त्याला भास झाला कीं चपाचे गाल लाल झाले आहेत मग ते शेगडीच्या धगेमुळें तसे झाले होते कीं .

रोजच्या त्याच्या गप्पात मधून मधून भाग घेणारी चपा अशीं लग्नाचीं बोलणीं निघालीं म्हणजे मात्र फुरगटून बसे मधेच तिचा खर्रकन् पाट फिरवून पाठमोरें बसण्याचा आवाज ऐकून मावशीबाईची माळ थाबली. त्यानीं लटक्या रागाने चपाकडे पाहिलें

— "लेऽ (घे) आमची चपाभी लई गुस्सा करते ये बाता वर पण भाई, आम्ही गरीब नी परदेश मदी पडलों, म्हणून ही पोरगी अजून कुवारी राहिली नाहींतर तिचा विवाह आणि लगन केव्हाच होऊन गेला असता "

— "अहो पण, विवाह अन् पुन्हा लग्न ही काय भानगड आहे बुवा ?" अविनाशनें विचारले

तपकिरीचा बार भरून, बोटें झाडीत मावशीबाई म्हणाल्या, "आमचेमदी पहिला मलामुलींचा सबध नक्की करते तेला विवाह म्हणते. मग मोटा झालेवर सवडीने लगन करते "

— "अरे वा !" आश्चर्यानें अविनाश म्हणाला "मग तुम्ही

गुजराती लोक बरेच पुढे गेला आहात कीं ! इंग्लिश लोकात सुद्धा असेच दोन विधि असतात बर का मावशीबाई ! ”

चार सहा महिने अशा प्रकारें अविनाशचा क्रम चालला होता. कृष्णेच निर्मळ पाणी, सकस काळया जमीनींतली ज्वारी, बाजरी, “ मळीं-तलीं ” वांगीं, आणि दुधदुभतें लोण्याचा सुकाळ, यामुळे अविनाश आता चागलाच ‘ तयार ’ दिसू लागला होता. त्याचा अभ्यासही ठीक चालला होता. फक्त त्याला जरा वाईट वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे अलीकडे मावशीबाई त्याच्याशीं नीट मोकळेपणानें बोलत नसत खर म्हटल तर त्यानीं उतराई होऊन जास्तच मायेने बोलावे चालावे अशीच परिस्थिति आली होती.

पावसाळयात कृष्णेला पूर येऊन ‘ खण भागा ’ पर्यंत पाणी पसरलें होतें. सतत धार, गारठा आणि तळमजल्यावरील ओल असलेली खोली, यामुळें चपा बरीच आजारी पडली होती एकश चार-पाचपर्यंत तिचा ताप जाई मावशीबाई घाबऱ्या झाल्या या दुखण्यात आपले कॉलेज बुडवून, सतत जवळ बसून अविनाशने मावशीबाईला धीर दिला, चपाची शुश्रूषा केली डॉक्टर आणणे, त्याच्या सागण्याप्रमाणें बर्फ डोक्यावर ठेवणे, टेंपरेचर टिपून ठेवणे, पथ्याकडे लक्ष्य देणे हे विलायती उपचार मावशीबाईना अज्ञात असल्याने अविनाशलाच करावे लागले प्रकृतीला उतार पडल्यावरही चपा हट्ट करी, औषध, पथ्य यात मावशीबाईना जुमानीत नसे तेव्हा तिची समजूत घालण्यासाठीं त्याना अविनाशलाच हाक मारावी लागे एखादेवळीं मावशीबाई जवळ नसल्या कीं ती त्याच्याशीं काहीं बोलण्याचा प्रयत्न करी—आणि गोंधळून गप्प राही शवटीं या साऱ्या शुश्रूषेला यश येऊन ती हिंडू फिरू लागली क्षीण आणि फिकट दिसूनही ती अविनाशला चवथीच्या ताशीव, क्षीण, चद्रकोरीप्रमाणें मनोहर वाटत असे.

या सर्व शुश्रूषेचे मावशीबाईनीं खूप आभार मानले—पण ते वर, अविनाशच्या खोलींत जाऊन कदाचित् या दुखण्यात झालेला चपाच्या भावनातील फरक मावशीबाईनीं चाणाक्षपणें ताडला असावा. कारण

आपण होऊन अविनाशला गप्पासाठीं बोलविणें त्यानीं बद केलें. तोच आपण होऊन येऊन बसला तर काहीं न बोलता त्या डोळे मिटून जोर-जोरानें माळ फिरवीत बसत अविनाशला हा प्रकार फार चमत्कारिक वाटू लागला.

पूर्वी मोकळेपणानें बोलणारी चपाही आता त्याच्याशीं बोलताना अडखळू लागली दुकानात बोलभाड गिऱ्हाइकाशीं मोडक्या मराठींत का होईना पण तावातावाने बोलून, शेरावर सव्वाशेर छाप ठेवून देणारी चपा आता त्याच्याशीं बोलताना मात्र एकदम लाल होई—एक दोन अस्फुट वाक्यें बोलून पळून जाई

तत्वज्ञानाचा विद्यार्थी असला तरी तिच्या अलीकडील वागणुकीचा अर्थ न कळण्याइतका अविनाश खास अरसिक नव्हता एके दिवशीं त्याने मनाचा निर्धार करून तिला नळाच्या कोंपऱ्यात गाठून विचारलेंच. "चपा ! किती दिवस चालायचा हा लपडाव ?—माझी होशील का तू ?"

जरा घुटमळत ती म्हणाली—"पण तुमचे लोक ?"

"मला कोणी लोक नाहींत" अविनाश म्हणाला "लोक नकोत मला, मला तू हवी आहेस तू हो म्हण, पुढच सगळ माझ्याकडे लागल"

—'पण बा ? ( आई )?'

इतक्यात 'चपा ऽऽऽ'—म्हणून मावशीबाईची कठोर स्वरात हाक आली आणि ती घाई घाईने आत निघून गेली तरीही मावशी-बाईंना सशय आला असावाच, कारण त्यानीं चपावरील नजरेचा फास आणखी आवळला.

सामान्य मैत्रींत कितीही मनमोकळेपणा दाखविला तरी त्यापेक्षा जरा जवळचा सबध येण्याची शक्यताही कुठें दिसली तरी जाति—वर्ण—देश याच्या सकुचित भावना कशा वर डोके काढतात, परकपणाची जाणीव करून देतात, याचा अनुभव अविनाशला आता येऊ लागला. हळू हळू मावशीबाईच्या घराचा दरवाजाही अविनाश दिसताच बद होऊ लागला.

अलीकडे एक काळा, खप्पड गालाचा, लांब केंसाचा, सदा सिगारेट शिलगावलेला नवखा गुजराती तरुण मधून मधून मावशीबाईशीं त्याच्या दुकानात कानगोष्टी करताना दिसत असे ही स्वारी मोठी नमुनेदार होती !

पायात पेटट लेदरचा पपशू, अर्धवट लोंबत सोडलेल्या कासो ट्याचें पोकळ तलम धोतर, त्यावरून कबरेशीं रूळत असलेली, सोन्याचें गिलीट उडालेली चादीची साखळी, रेशमी शर्ट, कबुतरी छातीवर विशोभित दिसणारा डबल ब्रेस्टचा कोट, वरच्या खिशातून डोकावणारा तांबडा भडक रेशमी रुमाल "पॉपिया लोशनचा" भपकारा सोडणारे उलट वळविलेले लांब केंस, आणि सदा तोंडात असणारी सिगारेट—यामुळें व्यापारी म्हणवूनही तो एखाद्या छाकट्या माणसासारखा दिसत असे बोलताना पुढचे दोन दात विचकून, काडीसारख्या मनगटावरील रोल्ड गोल्डचें घड्याळ बागड्यासारखे पुढे मागे करण्याची बायकी सवय त्याला लागलेली होती त्याचें नाव दलपतराम

मावशीशीं वाढलेल्या त्याच्या घरोब्याबद्दल अविनाशला वाईट वाटण्याचें कारण नव्हते—परतु त्याची नजर चपावर होती—तींत विवाह किंवा प्रेमाची सोज्वळ भावना नसून वैषयिक पिपासा होती हे दिसून मात्र त्याला वाईट वाटे हा मनुष्य कुठला, येथें कशाला आला याची कोणाला माहिती नव्हती कुणाचे तरी पत्र घेऊन तो आला व हळदी बाजारातील एका गुजराती किराणा मालाच्या दुकानात मुनीम म्हणून राहिला विशेष म्हणजे भोंवतालच्या काहीं "विशिष्ट वस्तींत" त्यानें इतक्यातच जानपछान करून घेतली होती, अशी उडत उडत बातमी अविनाशला कळली होती त्यावरून तो त्याची बाकीची सर्व माहिती काढण्याच्या उद्योगाला लागला

मावशीबाईशीं बोलताना चपाकडे पाहून त्याचें फिदीफिदी हसणें, ती केर काढीत असली तर सहज गेल्यासारखें दाखवून, मुद्दाम तिच्या अंगाला लागून जाणें, मावशीबाई बाहेर दुकानात असता आत पाटावर पाय पसरून बसून, भसाड्या आवाजात गुजराती प्रेमगीतें ललकारणें हे

प्रकार अविनाशला जाता येता दिसत आणि त्याला संताप येई त्यांच्या शेटजींची गाडीही भपकेदार माल भरून अनेकदा मावशीबाईंच्या छोट्या दुकानाशीं आलेली दिसत असे त्यावरून त्याची उधारीही खूप फुगत असली पाहिजे हें स्पष्ट दिसे

मावशीबाई मात्र त्यांच्या देशातील श्रीमतीच्या लंब्या चवड्या गप्पावर खूष होत्या तो आला कीं त्या त्याला मुद्दाम चपाकडून चहा करून देववीत आणि तिची स्तुति करीत त्याच्या फाजील सलगीबद्दल चपा तिरस्कार दाखवीत असूनही तो गेल्यावर त्याची स्तुति करून, त्याला चपाच्या मनात भरविण्याची मावशीबाईंची खटपट सुरू झाली.

एके दिवशीं अविनाश स्नानासाठीं खालीं नळाकडे जात असता चपा नळाशीं डोळे पुशीत उभी असलेली त्याला दिसली तो जरा घोंटाळला. मावशीबाईंचे मन मोकळें नाहीं हे पाहिल्यापासून त्याचें दोघींशीं बोलणें बहुतेक बद झालेंच होते पण अशा स्थितींत तिला पाहून त्याचें पाउल पुढें पडेना त्यानें विचारलें,

—' काय झाल चपा ! '

—' काय व्हायच उरलयू ? —माझ नशीब ' म्हणून तिने हुदका दिला दलपतचा वाढत जाणारा अतिप्रसग, त्याच्या मागणीच्या आशेनें मावशीबाईकडून त्याला मिळणारी फूस याची तिने त्याला थोड-क्यात कल्पना दिली शेवटीं डोळे पुसून ती म्हणाली,

—' माझ्यासाठीं आता तुम्ही आपला जीव झिजवू नका तुमच्या जातींतल्या, माझ्याहून शतपट रूपाच्या कितीक मुली असतील '

—' पण माझ्या चपावरून त्या साऱ्या ओंवाळून टाकीन मी. अविनाश म्हणाला ' मात्र तुला जर माझ्याबद्दल काहीं वाटत नसल तर स्पष्ट साग, पुढें एक शब्दही बोलणार नाहीं मी. '

—कपड्याचे पिळे खाद्यावर टाकीत ती हळूच म्हणाली—' माझ मन तुम्हाला माहीत आहे—तुमच्यामुळें तर मी जगलें—पुढे मी सागा-यला हव का ! पण माझी मी मुखत्यार नाहीं '

ती परत वळताना अविनाश तिला म्हणाला—' मावशीबाईंच

मन माझ्याबद्दल साफ नाहीं—त्याना तुला त्याच्या जातींतच देण्याची इच्छा आहे हें स्पष्ट कळतय मला माझ्याकडून एवढच साग त्याना कीं नीट तपास केल्याशिवाय सोयरीक जुळवू नका कुठे घाईनें विशेषतः हा दलपत महाभयकर मनुष्य आहे—त्याच्या भानगडी, व्यसन, आणि .

इतक्यात आतून मावशीबाईचा चवताळलेला आवाज आला—'मुई क्या गई ?' (कुठें गेली मेली ?) आणि अविनाशचे वाक्य अर्धेच राहिलें—

रागानें ओरडत बाहेर आलेल्या मावशीबाईचा त्या दिवसाचा अवतार निराळाच होता मागे दुकानाच्या गादीवर बसून, तपकीर ओढीत बसलेली, किंवा माळ फिरवीत अविनाशशीं गप्पा मारणारी ती मावशीबाई आता उरली नव्हती धुणें घेऊन चपा आत शिरली नळाशीं बादली लावणाऱ्या अविनाशकडे रागाने वळून मावशीबाई कडाडली—

—"ओ दखणीदादा ! लई ऐकला तुमचा बोलणा आता सागते तुम्हाला, आमच्या चपाशीं बोलण्याचा तुमचा काम नाय तुमच्या सारखा पोरियालोक आमच्या मुलीला बिगाडते ।"

या बोलण्याने अविनाश सर्दच झाला तरी मनातला राग गिळून, चपाच्या हितासाठीं सूचना देणें आपले कर्तव्य आहे असें समजून म्हणाला "मावशीबाई ! काय म्हणता तुम्ही हे ! आजपर्यंतच माझ कोणत वर्तन तुम्हाला वावग दिसल कीं तुम्ही असा आरोप करता माझ्यावर ? किती आपलेपणान मी तुमच्याशीं वागलों, किती काळजीन शुश्रुषा करून, चपाला मृत्यूच्या दाढेतून ओढून काढल—अन् त्याच साऱ्याच बक्षीस म्हणजे हा सशय, हा गैरसमज ! असो, तुमच्या मनाविरुद्ध जाण्याची माझी इच्छा नाहीं यापुढे मी शब्दही बोलणार नाहीं तुमच्याशीं पण चपासाठीं जीव तुटतो म्हणून अपमान गिळून पुन्हा सागतों, पोरीच्या जन्माच मातेर करू नका तुमच्या जातींतल्या कोणाही सत्पात्र, गुजराती तरुणाला द्या, पण या दलपतविषयीं मात्र सभाळा बर ! महाभयकर मनुष्य आहे तो ! त्याची लफडीं, कुलगडीं—"

—दलपतचें नाव ऐकल्याबरोबर नेहमीं एरवीं अगदीं शात अस-

णारी मावशीबाई अगदीं पिसाळली आणि अस्सल गुजरातींत अविनाशला शिव्या देऊ लागली

—" मुवा, तारा छाजीया लेवू, पिट्या केम मुवो नथी . ... "
( मेल्या, मरत का नाहींस अजून इ इ. )

—" खबरदार तेच्या नाव घेतला तर. " त्याला दम देत ती म्हणाली

" तेच्या सारखा आमचे जातचा पोरगा टाकून माझी चपा तुझ्यासारख्या परदेशीचा घर मांडेल काय ? "

विजेचा कडकडाट होऊन, क्षणात पुन्हा अंधार व्हावा त्याप्रमाणें रागाचे शब्द बोलून, मावशीबाईने दार लावून घेतलें

यानंतर कितीक दिवस असेच गेले सांगलीच्या हळदी बाजारातून गुजर वस्तींतून दलपतविषयीं अनेक निरनिराळे प्रवाद अविनाशच्या कानावर येऊ लागले परंतु आपल्याच छोट्या, मायलेकींच्या जगात वावरणाऱ्या मावशीबाईंना त्याची दादही नव्हती आणि अविनाशनें आता त्यांना कांहीं सांगण्याची सोयही उरली नव्हती

  

त्यानंतर सुमारें महिन्याचा काळ गेला असेल एके दिवशीं रात्रीं आठाच्या सुमाराला अविनाश खानावळींतून जेऊन, जिन्यावरून आपल्या खोलीकडे चालला होता मावशीबाईंच्या दुकानाचें दार बंद होतें. आतल्या खोलींत दिवा जळत असल्यानें चंपा एकटी स्वयंपाकात असल्याचें दिसत होतें इतक्यात त्या आतल्या खोलींतून गुजरातींत उच्चारलेले आर्जवाचे, भीतिचे आणि दरडावण्याचे काही शब्द कानीं येऊन, अविनाश एकदम दचकला ! चंपाचा भीतीनें कापरा झालेला आवाज, आणि दुसरा दरडावणारा, झिंगल्याप्रमाणें अडखळणारा, दलपतचा आवाज ऐकून त्याला कसेसेंच झालें

—" पुरे झाली ही ढोंग चंपा " दलपत खेंकसत होता. " त्या दखण्याशीं नळावर गप्पा मारायला तुला गोड वाटत, आणि मी इतकी

आर्जव करीत असताना एक शब्द न बोलता तोंड फिरवितेस नाहीं का! ठीक आहे. एकदा लग्न होऊ दे आपल म्हणजे छडीने चागली सरळ करतों, मग कुठे जाशील! कालच तुझ्या आईने तुझ माझ्याशीं लग्न ठरवल आहे आता जर माग घेतल तर तुझ्या दुकानचा उद्या लिलाव पुकारतों शेटजी-कडून त्या पैशासाठींच मुदत मागायला ती थेरडी जाऊन बसली आहे आता आमच्या शेटजीकडे त्याचे पाय धरून आता मुकाट्यान नीट बोलून, हसून माझ्याशीं लग्न केल पाहिजे तुला जर काहीं गडबड केलीस तर देशावर जाऊन त्या दखण्याचा आणि तुझा सबध होता अस जातीच्या पचाना सागून घालवीन तुमच्या साऱ्या कुटुबावर बहिष्कार म्हणून म्हणतों, मी सरळ आहे तोंपर्यंत चागला आता मुकाट्यान माझ ऐक अन् आपल लग्न झालच आहे असच समजून माझ्याशीं वाग आपल्याला बुवा नाहीं दम निघत देशावर जाऊन, वर्ष सहा महिन्यान सारे विधी होईपर्यंत "

तेवढ्यात चपाची एक किंकाळी आली, आणि खळकन् बागड्या फुटल्याचा आवाज आला त्यानतर मात्र अविनाशला रहावेना त्याच्या खोलीच्या मागील ठेंगण्या सज्जातून त्याने मागीलदारीं उडी मारली एका लाथेनें जीर्ण झालेले दार बिजागऱ्यानिशीं मोडून उघडलें

एका कोपऱ्यात अगदीं घाबरलेली चपा अग चोरून उभी होती तिचे केंस विस्कटलेले होते मनगटातून रक्ताची धार लागली होती, आणि हातातील बागड्याचे तुकडे इकडे तिकडे जमिनीवर पडले होते जवळ उभ्या असलेल्या दलपतचे डोळे धुद झाले होते तो बोलू लागताच त्याच्या तोंडातून भपकन् दारूचा वास आला – "अरे ओ 'तातिया!' तू कोण इथें आमचे घरामधीं घुसते! ए चपातर माझी बायडी आहे–"

यावर सताप अनावर होऊन अविनाशने खाडकन त्याच्या एक कानशिलात ठेऊन दिली त्या बरोबर त्याचा कळकासारखा पोखरलेला देह कोलमडून पडला पडल्या पडल्याच त्यानें अविनाशला शिव्याची लाखोली वाहिली आणि मधेच " पोलीस पोलीस " म्हणून ओरडण्याचा आव आणला. त्याचा हात धरून उठवीत अविनाशनें त्याला दरडावलें.

"बोलाव खुशाल पोलिसला. माझच काम होईल. आल्याबरोबर तुलाच त्याच्या ताब्यात देतों या भोळ्या मावशीबाईवर तू भुरळ टाक-लीस म्हणून साऱ्याचे डोळे काहीं आंधळे झाले नाहींत कुणाला धाक दाखवितोस पोलिसचा? अमदाबादेतून चोरी करून तू फरारी झालेला आहेस नाव बदलून, आडवळणाच्या सागलींत तू मुनीम म्हणून नोक रीला राहिला आहेस. अन् साऱ्यावर कळस म्हणजे तुझ लग्न झालेल असून बायकामुल तुला शिव्या देत, 'टाचा घाशीत, अमदाबादेंत भिकेचे तुकडे मोडीत आहेत, आणि तू इकडे येऊन आणखी एका निष्पाप मुलीचा गळा कापायचा बेत केला आहेस एक शब्द मी बोललों तर हातकड्या पडतील तुझ्या हातात"

गडबड ऐकून भोंवतालीं लोक जमा होऊ लागले होते घरीं परतणारी मावशीबाईही काहीं गोंधळ ऐकून दचकली मागीलदारानें ती आत येताच "ओ माडी"! (आई ग) म्हणून चपा रडत तिच्या गळ्यात पडली

"ए काय चालला आहे"!! म्हणून मावशीबाई रागानें आणि अर्धवट भीतीनें उद्गारल्या दारूच्या धुदींत निश्चेष्ट होऊन कोपऱ्यात पड-लेल्या दलपतकडे बोट दाखवून अविनाश म्हणाला, "हा सारा तुमच्या जातिद्वेषाचा आणि गैरविश्वासाचा परिणाम या बदमाषाबद्दल मी तुम्हाला इषारा देत असता तुम्ही माझ ऐकल नाहीं, या अनोळखी, चोर, दारुड्या नरपशूच्या गळ्यात चपासारख रत्न तुम्ही बांधणार होता त्यात त्याच आधींच लग्न झालेल आहे का नाहीं याचीही तुम्ही चौकशी केली नाहीं अमदाबादचा हा भामटा उचापत करून, नाव बदलून इथें आला. त्यावर पोलिसचें वारट सुटलेलें आहे. त्याचीं बायकामुल भीक मागताहेत अमदाबादेंत

—माझ्याबद्दल तुम्हाला द्वेष वाटत होता, चपाला माझ्याबद्दल प्रेम वाटून तिच माझ लग्न होईल अशी तुम्हाला भीति वाटत होती, जातिद्वेष वाटत होता. पण म्हणून असा का मार्ग पत्करायचा? इथेंही दुसरे गुज-राती आहेतच, पुण्याला गुजराती समाजातही माझे अनेक मित्र आहेत.

तुमच्या मनाप्रमाणें एखादा सुशिक्षित, सदाचरणी गुजराती तरुण मी होऊन चपासाठीं पाहून दिला असता, पण या बदमाषानच तुमच्या मनात जाति-द्वेष भरवून दिला होता तुमचा सत्यानाश करून हा मुकाट्यानें दुसरीकडे सटकला असताच मी मात्र मुकाट्याने याच्यावर पाळत ठेवली असल्यानें याचा बेत फसला लग्नाचेहि समाधान त्याने तुम्हाला लाभू दिलें नसतें पुढच्या लग्नाच्या नावावर आजच त्याने चपावर कोणता प्रसग आणला होता हें तिलाच विचारा ! " सारा प्रकार कळल्यावर " हाय हाय " म्हणून छाती बडवीत, हतबुद्ध होऊन मावशीबाइनें बैठकच मारली

✱ ✱ ✱ ✱

शेवटीं न्यायावर दयेचा आणि जातिप्रेमाचा विजय झाला मावशीबाईच्या हात जोडून केलेल्या विनतीमुळें अविनाशला दलपतविषयीं तोंड बद ठेवावें लागले कसाही असला तरी आपल्या जातीचा एक तरुण तुरुगात जावा ही कल्पनाच मावशीबाईना सहन होईना परतु त्याबद्दल काहींएक आभार न मानता, दुसरीकडे आपले कपटजाल पसरण्यासाठीं तो गुपचुप रात्रींच्या गाडीने मुबईकडे रवाना झाला जाताना मात्र निर्लज्जपणें हसून तो मावशीबाईला म्हणाला " ओ बुड्ढी ! ये दखणीलाच आता जमाई करून घे ! "

पण थट्टेचे शब्दही कधीं कधीं खरे होतात एकुलत्या एक मुलीच्या विनवणीनें म्हणा, तिच्या जीव देण्याच्या धमकीनें म्हणा, दोन्हीं-वेळा अविनाशनेंच तिला वाचविले या कृतज्ञतेने म्हणा— कशानेही असो, शेवटीं ओशाळून, बरेच आढेवेढे घेऊन मावशीबाईने अविनाश आणि चपा याच्या लग्नाला समति दिली. सागलींतील दोन्ही समाजात त्यावेळीं केवढें वादळ झालें ! कृष्णाबाईच्या घाटावर ब्रम्हवृदाची सभा झाली, हळदी बाजारात गुजराती जमात जमली विनती, समजावणी, बहिष्कााराची धमकी सारे प्रयत्न झाले एकदा तर काहीं गुडानीं कुपवाडच्या माळावर एकटा गाठून अविनाशचें डोकें फोडण्याचाही प्रयत्न केला. परतु हे विरोध न जुमानता, 'नरसोबाच्या वाडीला' हा लग्नसमारभ साजरा

झाला. अनेक ' अनुभवी ' लोकांनीं माना हलवून केलेली त्याच्या मिश्र संसाराच्या भांडणतंट्याचीं भविष्ये खोटीं ठरून, आज अविनाश आणि चंपा आनंदानें संसार करीत आहेत

आज मावशीबाई हयात नाहींत, परंतु जाण्यापूर्वी त्या दोघांचा संसार डोळाभर पाहून, आशिर्वाद देऊन गेल्या अविनाशच्या शिक्षण आणि पदवीचा उपयोग त्यानें नोकरीकडे न करता दुकानाची नवी व्यवस्था ठेवण्याकडेच केला आहे या साऱ्या भरभराटीचें श्रेय अविनाश मात्र चंपाला, आणि त्याच्या सांगलींतील वास्तव्यालाच देतो

❧ ❧ ❧ ❧

" वा ! वा ! खूप केली ! छान–"

भाऊसाहेबांनीं शेवटीं गजर केला "बाकी ही तुमची वल्ली एकदा पाहिली पाहिजे बर का ! एकदा आमची ओळख करून द्या या तुमच्या सांगलीच्या मित्राशीं "

"—अवश्य !" मी उत्तरलों " पण त्याचं हें करण किती लोकांना पसंत पडेल याचीच शंका वाटते मला–आपलं अनुभवी मत काय आहे नानासाहेब ! "

—नानासाहेब आणखी एक सुपारी उचलून अडकित्यानें कातरीत म्हणाले, " माझ्या बोलण्यावर बाजू उलटवलीत खरी ! मी महाराष्ट्र आणि गुजरातच्या गुणांचं एकीकरण करावं म्हणून म्हणालों, तर त्यापेक्षा निराळंच एकीकरण करणारं उदाहरण दाखविलंत तुम्ही ! बाकी यात फारसं वावगं वाटलं नाहीं मला " स्त्रीरत्नं दुष्कुलादपि " असं म्हटलंय आपल्याकडे त्यातून हीं दोघं ब्राम्हणच होतीं म्हणताना तुम्ही ? . . "

—भाऊसाहेब मात्र उत्साहानें ताठ उठून बसले, " बस्–आपल्याला अगदीं पसंत आहे तुमची गोष्ट ! तुमचा मित्र जर इकडे असता तर मी त्याच्या पाठीवर थाप मारून अभिनंदन केलं असतं त्याचं— अन् म्हणालों असतों ' नशीबवान् आहेस लेका ! आमच्या गुजराथी वहिनी एकदा दाखविल्याच पाहिजेस आम्हाला ! पुढे येऊन तुझ्या दक्षिणी भाउजीला नमस्कार ठोकला पाहिजे त्यांनीं "

—" तितकी इच्छा अन् सद्धेतु असला तर आताही शक्य आहे हें " मी म्हणालों —

"—काय म्हणता ! इथ आलाय् तुमचा मित्र ? तर आज आपण जाणार बुवा त्याला भेटायला—नानासाहेब तुम्हीही आल पाहिजे. "

—" ठीक आहे, इतकी तयारी असली तर लाब जायला नको " मी म्हणालों

बैठकीच्या दारामागून बागड्याचा आवाज आला—

गोल गुजराती पातळ, घोट्याखालीं पावलावर रुळणाऱ्या बारीक 'सुरती' साखळ्या, दडावर सोन्याचें एक कडे आणि डोक्यावरून घेतलेला कपाळावर पुढे ओढलेला पदर, या थाटात आलेल्या स्त्रीनें दारातून चहाचा ट्रे बैठकींत ठेवला, आणि जरा स्मित करून, नमस्कार करून ती आत निघून गेली

भाऊसाहेब आणि नानासाहेब तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहातच राहिले—आता त्याना खऱ्या प्रकाराची हळूहळू कल्पना येऊ लागली होती.

"भले महाराज ! म्हणजे हे तुमचे सागलीचे मित्रवर्य म्हणजे...?"

—" मीच ! "

—" अन् ती सागलीची चपा म्हणजे ? "

—" आता माझी पत्नी—आता तुम्हाला नमस्कार करून गेली तीच ! आता खुशाल करायची असेल ती टीका करा माझ्यावर. "

—छे ! छे ! ! टीका नव्हे अभिनदनच ! "

म्हणून चहा सपवून पाहुणे उठले, आणि मीही नव्या दुकानाच्या किल्ल्या फिरवीत खालीं निघालों

---

## २ : ब्रॅडमनचा बाप

Very interesting

—मनुष्य गाढवाप्रमाणे बोलतो यात काहीं नवल नाहीं परतु उद्या जर अशा बातम्या आल्या— कीं गाढव मनुष्याप्रमाणे बोलू लागलें, घोड्याला पख फुटून बघता बघता तो आभाळात उडू लागला, समुद्रातले सर्व मासे पाण्यातून बाहेर येऊन जमिनीवर सफर करू लागलें, पुरुषानीं स्त्रियाकडे आणि स्त्रियानीं पुरुषाकडे चोरून पाहाण्याचें सोडून दिलें, इग्लडनें आपखुषीने हिंदुस्थानला सपूर्ण स्वातत्र्य बहाल केलें—

या सर्व विस्मयकारक बातम्या एकाच वेळीं ऐकू आल्या असल्या तरी बसला नसता इतका आश्चर्याचा धक्का आम्हाला एका ऐकीव ताज्या बातमीनें बसला होता! ती बातमी म्हणजे माझा मित्र -शास्त्रज्ञ, बापूराव प्रयोगे हा एकाएकी क्रिकेटच्या मैदानावर पट्टीचा खेळाडू म्हणून उतरला! उतरला इतकेंच नव्हे, तर पहिल्याच मॅचमध्यें त्यानें साडेसहासष्ट धावा काढल्या! (म्हणजे एक धाव अर्धी असतानाच तो शेवटीं रन–आउट झाला होता!)

बापूरावाचा परिचय असणाऱ्या कोणाहि व्यक्तीला त्याची क्रिकेटमधील मर्दुमकी ही एक अशक्यप्राय गोष्ट वाटली असती. कारण ज्या वयात लहान मुलें काठ्याचे स्टम्प्स करून, एखाद्या फळकुटाची बॅट आणि

चिंध्याचा चेंडू करून क्रिकेटच्या मॅचेस् खेळत, त्या वयापासून बापूरावानीं खेळाऐवजीं सर्वांत अवघड अशीं गणितें फडाफड तोंडीच सोडविण्याचा पराक्रम सुरू केला होता प्राथमिक शाळेपासून तों आता फिजिक्समधील ऑप्टिक्स ( दर्शनशास्त्र ) हा विषय घेऊन डी एस्सीसाठीं संशोधन करीपर्यंत बापूरावाने एकदाहि क्रीडागणावर पाऊल टाकलें नव्हतें शाळा-कॉलेजाच्या मॅचेस् तर राहोतच, परंतु पंचरंगी सामने, रणजी ट्रॉफीच्या मॅचेस यांबद्दलहि त्यानें कधींच कुतूहल दाखविलें नव्हतें

एखाद्या फकिरासारखी पायघोळ पांढरी कफनी घालून, भकास चेहरा करून तो प्रयोगशाळेंतील टेबलाजवळ नेहमी उभा असे परंतु गेल्या पंधरवड्यापासून मात्र हा विज्ञानाचा विश्वामित्र एकाएकी चळल्या-सारखा दिसू लागला होता अर्थात् याला कारण एखादी मेनकाच असली पाहिजे याची खूणगाठ आम्ही मनाशीं बांधून ठेवली “ ती कोण ? ” हा प्रश्न बापूरावाच्या मित्रमंडळींत सारखा चर्चिला जात असे परंतु सरळ हल्ल्याना दाद देणारा गडी बापूराव नव्हता. एके दिवशीं प्रयोगशाळेंतून तो जरा स्टोअर रूमकडे गेलेला पाहून मी त्याची टाचणवही सहज उघडली अलीकडील प्रयोगाच्या आकडेमोडींत मधून मधून “ हेमलता–हेमा–हेमी ” अशीं नावें मराठी-इंग्रजी लपेटींत दिसत होती मध्येच उरलेल्या कोन्या जागेत नवशिका काव्यात्मकतेचा प्रयोग म्हणून —

“ हेमी ! तू माहेमी हलव्याहून गोड आहेस” अशी उपमा देऊन, काव्याच्या नवख्या प्रांतात शिरण्याची बापूरावाची धडपडहि दिसली दोन पानें उलटतों तों एका मुलीचा फोटो टाचणीनें अडकवून ठेवलेला दिसला. त्याच्या कोपऱ्यात वाऱ्यानें कवलेल्या गवताप्रमाणें कोलमडून पडणाऱ्या तिरप्या अक्षरात “ कु. हेमलता कर ” अशी सही होती

संध्याकाळीं आमच्या मित्रमंडळींत बापूरावाच्या या प्रेयसीबद्दल विषय निघाला मीं तिचें नाव सांगताच सोन्याबापू एकदम उद्गारला,

“ ऑं ! ती पोरगी का ? ती तर डी. एम्. सी. जिमखान्याच्या त्या बग्या गुप्ते क्रिकेटिअरवर फिदा आहे. साऱ्या गावात झाल आहे हें ! तो खेळायला निघाला कीं ती बेंडर मुलगी त्याचीं पॅडस् बांधून देते काय,

मधूनमधून 'बक–अप्' म्हणून ओरडते काय! बस्स, विचारू नकोस! तो पाचपन्नास धावा काढून आला कीं हिच्या पिशवींत ठेवणींतला एखादा हार तयार असायचाच सर्वांदेखत पुढं जाऊन शेकहॅंड करून ती तो हार त्याच्या गळ्यात घालते अन् छोट्या कॅमेऱ्यान त्याचा चटकन् फोटोहि घेते "

—" या खेळाडू अन् नखरेल हेमलतेवर आमचा बालब्रह्मचारी, विज्ञानशास्त्रपारगत, रुक्षपंडित बापूराव कस इम्प्रेशन मारणार बुवा!"

हा काथ्याकूट झाल्यानतर तिसऱ्याच दिवशीं माझ्या कानावर मघाची बातमी आली, कीं डी एम् सी जिमखान्याच्याच टीममधून बापूराव एकाएकीं क्रिकेट खेळायला लागला आणि पहिल्याच मॅचमध्यें त्यानें साडेसहासष्ट रन्स काढल्या!

चक्षुर्वै— असे काहीसें म्हणतात ना, त्याप्रमाणें या प्रकाराचा छडा लावण्यासाठीं पुढल्या शनिवारीं आम्ही सारे मुद्दाम डी एम् सी-जिमखाना विरुद्ध दापोडी क्रिकेटिअर्स हा सामना पहायला गेलों ग्राउड-वरचा सामना सुरू होण्याआधीं आमच्या तबूतच एक विचित्र सामना सुरू झाला होता

पहिल्या रांगेंतल्या हेमलतेच्या खुर्चीच्या दोन बाजूना बग्या गुप्ते अन् बापूराव प्रयोगे मोर्चे बाधून तयार होते आणि ती धीट पोरगीहि एकदा एकाच्या तर एकदा दुसऱ्याच्या डोक्याशीं डोकें नेऊन, हसून कुजबुज करी ग्राउडऐवजीं बहुतेकाची नजर या बाजूलाच वळली होती.

टाळ्याच्या गजरात डी एम् सी ची पहिली जोडी खेळावयास गेली. तिसरा गडी बग्या गुप्ते हा असल्याने हेमलता त्याचा जामानिमा करू लागली.

कमरेला करकचून बाधलेला टॉय, फलॅनेल पॅंटवर बाधलेलीं पाढरी शुभ्र, पायाचीं पॅडस्, तहान लागू नये म्हणून खिशात लेमनच्या गोळ्या आणि हातावर जाड स्पजासारख्या रबराचे हातमोजे, असा सारा थाट तिनें करून दिला पूर्वी रणागणावर जाणाऱ्या शिलेदाराचा जामानिमा त्याच्या चहात्या स्त्रिया करून देत असत म्हणतात—अगदी त्याप्रमाणेंच.

आदल्या दिवसाच्या पावसामुळे मैदानावरची हिरवळ चिंब

भिजली होती बोलरचा चेंडू जमिनीवर हातभरहि उडेना! कितीहि जोराने मारलेला चेंडू जिथे पडला तिथेच अफूबाजाप्रमाणे झोकांडे खात पडून राही वरून येणाऱ्या चेंडूच्या दिशेनें ऐटीन बॅट फिरवावी तर तो एकदम 'शूट' होऊन बॅटीखालून स्टम्प्समध्यें घुसे पहिला गडी दोन धावा झाल्या असताच सफाई चीत झाला! आता बग्या गुप्तेची पाळी होती तो निघाल्यावर साऱ्या तंबूतून टाळ्याचा गजर झाला हेमलता तर आपला टीचभर रेशमी रुमाल सारखा फडकावून खुर्चीवरच बस फुगडी खेळत होती मागे वळून तंबूकडे विजयाने पाहून, बग्यानें दोन्ही हातात बॅट डोक्यावर धरून हवेतच तलवारीसारखे पवित्रे फिरविले

पहिल्या चेंडूलाच बाउंड्रीसाठीं ऐटीने त्याची बॅट लकन् फिरली हेमाने टाळ्या वाजविल्या बग्याहि ऐटीने पलीकडे धावला, पण बाउंड्री-जवळच्या खेळाडूने तो चेंडू अलगद झलून वर उडविला!

एकदम शंभर पाली चुकचुकाव्यात असा चक् चक् चक् आवाज साऱ्या तंबूतून आला! कपाळावरचा घाम पुशीत जरा गोरेमोरें तोंड करून बग्याने हेमजवळच्या खुर्चीवर बैठक मारली, तों

हेम मान फिरवून बापूरावाशीं गुलगुल गोष्टी करू लागली तिनें बग्याकडे पाहिलेंहि नाहीं! त्याने पॅडस् काढून वैतागानें जमिनीवर आपटल्या, दातओठ खाल्ले आणि 'एक सोडा' मागविला!

इकडे साऱ्या खेळाची घडी विस्कटत चालली होती मोहऱ्याचे सहा गडी चीत होऊन फळ्यावर धावा मात्र पचविसाच्या आतच होत्या.

बापूराव नवीन असल्याने त्याचा नंबर सातवा होता तो जाण्यासाठीं निघाल्यावर साऱ्या तंबूतून—"आता बापूराव! या पठ्ठे बापूराव!" म्हणून एकच गजर झाला पहिल्या खुर्च्यांच्या पुढे गवतात लोळणारीं लहान लहान मुलेंहि "बापूराव! बापूराव!" म्हणून टाळ्या वाजवून नाचू लागलीं मात्र या साऱ्या कल्लोळात उत्तेजनाचा भाग किती आणि कुचेष्टेचा भाग किती याचे ततोतंत प्रमाण बापूरावासारख्या शास्त्रज्ञालाहि सांगता आलें नसतें

अन् लोकांनीं तरी चेष्टा का करू नये? पिचकडे निघालेल्या बापू

रावाचा वेष आणि चर्या कोणालाहि हसू आणील अशीच होती. फ्लॅनेल-पँटची गोष्ट तर सोडूनच द्या, मळकट आबाशाही धोतराचा काचा, त्यातून गुडघ्यापर्यंत डोकावणारे लाल काठाचे खाकी पायमोजे, काळाकुट्ट झालेला अबाडीच्या दोरीनें बांधलेला जुना टेनिस-शू, गजिफ्रॉकवजा अर्ध्या बाह्याचा बिनकॉलरचा सदरा, त्यातून माळेसारखें कळकट जानवें गळ्याशीं डोकावत होतेच! या अवतारात आमचे बापूराव क्रिकेट-क्षेत्रा-वर मर्दुमकी गाजविण्यासाठीं निघत होते पॅडस्, हातमोजे वगैरे घाल-ण्याचे त्यानीं साफ नाकारले काखेत काठीसारखी बॅट धरून, धोतराचे कान पकडून काचा आवळीत बापूराव पिचकडे धडपडत जात होता साऱ्या तबूतून कुचेष्टेच्या टाळ्या पडल्या जाड, निळसर काचेच्या चष्म्याआडून डोळे गरगर फिरवीत, या कानापासून त्या कानापर्यंत दत-पक्ति दाखवीत हसत त्याने सर्वांना वळून नमस्कार केला 'झीरो मशीन' फिरविल्यानें केलेला डोक्याचा गोटा आणि नमस्काराचा हा पवित्रा पाहून सर्वत्र हशाचा कल्लोळ उडाला.

जुन्या जमान्यातले इग्रजी खेळाडू ज्याप्रमाणे अगदीं ताठ उभे राहून, फळीप्रमाणे उभी बॅट जमिनीवर टेकीत, त्याप्रमाणे फताडे पाय करून सरळ बॅट धरून बापूराव उभा होता.

"काय स्टाइल आहे!" सर्वत्र कुचेष्टेचे उद्‌गार निघत होते. दापोडी टीमच्या पार्शी बोलरनेंहि चेंडू टाकण्याआधीं कुचेष्टेने बापूरावाला धोक्याची सूचना दिली.

"अरे तात्या! जरा सभाळूनशेनी खेलावा, बरा का! धोतिया खराब होयेल!"

पहिला चेंडू येताच जागच्या जागीं एखाद्या मोराप्रमाणें बापू-रावाच्या पायाची थय्‌थय् हालचाल झाली सारे हसू लागले पण आश्चर्य हें, कीं चेंडू मात्र बाउड्रीपार गेला! अपायरनें आडवा हात हालवितांच सर्वत्र आश्चर्याची स्तब्धता पसरली. सोड्याच्या बाटलीप्रमाणें फसफस-णारा बग्या गुते अर्ध्या हशातच थांबला! तरीहि हेमाच्या कानात कुज-

बुजलाच, " मामा लेकाचा! हेम, एक ऑम्लेट अन् बिअरच्या बाटलीची पैज तुझीमाझी! या ओव्हरमध्येंच खलास होतोय् बाप्या!"

"वा, तात्या! लई चागला मारलास!" म्हणून पारशी बोलरनें हाताला थुकी लावून, ऑफ–ब्रेक टाकण्यासाठीं चेंडूवर वाकडीं बोटें टाकून पाठीकडे हात वळविला

तो चेंडू येतानाहि बापूरावाचे पाय पुन्हा वेडेवाकडे वळले पण चेंडू जमिनीवर पडून वळण्याआधींच बापूरावानें चमत्कारिक आडवी तिडवी उडी मारून, वाकडी बॅट फिरवून चेंडूला असा टोला दिला, कीं तीन धावा झाल्या!

आता समोरचा गडी खेळू लागला धोतर सावरीत, चष्म्याच्या जाड निळसर काचा पुशीत, कलिंगडाच्या फाकेप्रमाणे चद्रकोरी हास्य करीत दात दाखविणाऱ्या बापूरावाकडे सारे आश्चर्यान पाहात होते

"काय क्रिकेट खेळतोय् बेटा कीं लगोऱ्या! अहो, घडघडीत क्रॉस–बॅट. (आडवी बॅट)!" बग्या गुप्त गोरामोरा होऊन भोंवता लच्या मडळींना सागू लागला

क्रॉस बॅट असो, सरळ असो, वाटेल त्या रीतीनें पण अचूकपणें चेंडूला पकडून त्याला बॅटने ठोकायचें हा बापूरावाचा क्रम चालला होता. एखादा पळता उदीर चपळपणे पकडून त्याच्या टाळक्यात दाडके हाणणाऱ्या कोंकणी गड्याइतकी 'ग्रेस' बापूरावाच्या खेळण्यात असेल, पण तितकाच बिनचूकपणाहि होता पूर्वीची कुचेष्टा जाऊन आता दापोडीवाले जीव तोडून बोलिंग करीत होतें

पण कितीहि तुफान वेगाने चेंडू येवो, त्याला बिलकूल न घाबरता तो जिथें पडणार तिथेंच नेमकी बापूरावाची बॅट अचूक ठरलेली अशा बेफाम चेंडूचा रोख आणि 'टप' त्याला पडण्याआधींच कळतो कसा, याचेंच साऱ्याना आश्चर्य वाटे! शेवटीं त्याला भिवविण्यासाठीं एका काळ्याकुट्ट, आडदाड, घण मारणाऱ्या लोहारानें थेट बापूरावाच्या अगावरच चेंडू मारून 'लारवुड'च्या प्रसिद्ध 'बॉडीलाइन बोलिंग'ची (डोकेफोडी चेंडूफेक) आठवण करून दिली. पण ते भयकर चेंडूहि एखाद्या

पोरानें हळूच फेकलेले रबरी चेंडूच आहेत कीं काय अशा सहजपणें बापूरावानें टोलविले कसे तें मात्र त्यालाच माहीत! हा अद्‌भुत प्रकार सारे प्रेक्षक ताड्‌कन् खुर्च्यांवरून उठून, उभे राहून पहात होते शेवटीं समोरचे सारे गडी बाद झाल्यानें अजिंक्य राहून बापूराव परतला!

वसईच्या कावडीवाल्या गवळयाप्रमाणें खाद्यावर आडवी बॅट टाकून, तिला दोन हातानीं लोंबकळत, बापूराव तबूकडे परत आला. त्याचा स्कोअर एकूणनव्वद रन्स, नॉट आउट हा होता

यावेळीं मात्र हेमलतेची राखीव माळ बापूरावाच्याच गळयात पडली तिच्या छोट्या कॅमेऱ्यात त्याचीच छबी उमटली अन् हृदयात?

फील्डिंगच्या वेळीं मात्र बापूरावाने कहर केला हसूनहसून खेळणाऱ्याचीच नव्हे, तर पाहणाऱ्यांचींहि पोटे दुखू लागलीं साधे पळते चेडू उचलतानाहि त्यानें सातआठ वेळा साष्टाग नमस्कार घातले पायातल्या दिल्लीदरवाजातून तर किती वेळा चेंडू गेले याची गणतीच नव्हती!

एखादे वेळीं आंधळयाचा हात लागून जातो, म्हणजे काय तो कायम राहातो कीं काय? बापूरावासारखा लाटणेवाला दुसऱ्या इनिंग्ला तरी साफ उताणा पडणार असें बहुतेकानीं ठाम भविष्य करून ठेवलें परतु आश्चर्य हें, कीं या वेळींहि पुन्हा पहिल्या अडदाडपणेंच, धडपडीने, एकदोनदा तर पिचवर गुडघे टेकून, लोळण घेऊनहि बापूराव शर्थीनें खेळला. सेंचरी काढून, बिनबाद राहून तो परतला शेवटीं डी. एम् सी जिमखान्यानें दापोडी टीमला चार विकेटस् आणि सव्वाशे रन्सनीं मार दिला याचें सारें श्रेय बापूरावाला!

प्रसिद्धि मिळालेल्या मनुष्याचें वैगुण्यहि त्याला शोभादायक होतें. हळूहळू लोक म्हणू लागले, कीं बापूरावासारखा पट्टीचा खेळाडू लोकाना हसविण्यासाठीं मुद्दामच असे बावळटपणाचे प्रकार करीत असला पाहिजे. आता त्याला कुचेष्टेतूनच प्रतिष्ठा लाभली होती.

आणि हेमलता? ती तर आता त्याच्या भजनींच लागली होती. आरतीच्या आधीं देवमूर्तीला शृगार करून सजवावी त्याप्रमाणें ती बापूरावाला प्रत्येक मॅचच्या वेळीं सजवीत असे. तिचा हात लागल्यामुळें

आता त्याचा म्हाबळभटी अवतार नाहींसा होऊन तो दिसण्यातहि अस्सल क्रिकेटिअर झाला होता

इस्त्रीची झुळझुळीत पांढरी फ्लॅनेलची पॅंट, ओपन कॉलरचा रेशमी शर्ट, गळयात टॉयप्रमाणे अडकविलेला, गाठ मारलेला हातरुमाल, पांढरे रेशमी सॉक्स् आणि भारी इंग्लिश क्रिकेट–शू पायात आता झीरो मशीनच्या हिरवळीऐवजी त्याच्या डोक्यावर माथेरान डोलू लागलें होते त्याला 'ब्रिलक्रीम्' लावून हेम स्वत त्याचा सुंदर भाग पाडून देई. खोलींतून निघण्यापूर्वी तिने दाराआडून दिलेली ओठावरची साखर मनात पुन पुन: चाखीत बापूराव ग्राउंडवर येत असे तो दिसताच —' बक् अप् बापूराव! जीते रहो बापूराव! वा, पठ्ठे बापूराव! सेंचरी हवी आज बापूराव!" म्हणून साऱ्या ग्राउंडवरून ओरड होई

रेडियोवरील साप्ताहिक क्रीडावृत्तात बॉबी तल्यारखानानेहि 'डिफफीनेट्ली' म्हणून ठसक्यात आपल्या घोगऱ्या आवाजाने बापूरावाची तुलना अनेक विनोदी इंग्रजी आणि ऑस्ट्रेलियन खेळाडूबरोबर केली. "पूना फनी मॅन मेक्स् गुड्! सेंचरीज् गॅलोअर! (पुण्याच्या विनोदी खेळाडूचा पराक्रम! शतकाची खैरात!)" म्हणून 'इंडियन क्रिकेट' आणि 'इलस्ट्रेटेड् वीकली' सारख्या बादशाही पत्रातूनहि बापूरावाचे फोटो झळकू लागले

पण हा असा बावळट, यापूर्वी जन्मात क्रिकेटची बॅट हातात न घेतलेला शास्त्रज्ञ एकाएकी अजिंक्य क्रिकेटपटु कसा झाला हें कोडें मात्र कोणालाहि उलगडेना! क्रिकेटचे आजन्म शास्त्रीय अभ्यासू तर बापूरावाचें नाव काढलें कीं चिडू लागले अशा एकाला मी मुद्दाम खोंचून खोंचून म्हटलें, "घे लेका! जन्मभर क्रिकेट क्रिकेट म्हणून शख करतोस, पुस्तक वाचतोस, उन्हात हमाली करतोस, पण जन्मात क्रिकेटग्राउंडहि न पाहिलेल्या आमच्या लाटण्या बापूरावान तुम्हा साऱ्याचीं नाक खालीं केलींच कीं नाहीं? अरे, क्रिकेट क्रिकेटची बिशाद ती काय?"

त्यावर त्यानें अगदीं गंभीरपणें खडूचा तुकडा घेऊन बापूराव ज्या पोझिशनमध्यें खेळतो त्यात त्याचा त्रिफळा उडालाच पाहिजे, नाहींतर

क्रिकेट हा गेमच नाहीं, हे मला आकृति काढून सिद्ध करून दिलें. पण त्याप्रमाणे प्रत्यक्ष का होत नाहीं हें मात्र त्याला सागता येईना !

शेवटीं या साऱ्या 'शास्त्रीय टीकाकाराना' धास्ती होती तेंच झालें ! मुंबईच्या हिंदु जिमखान्याची सिलेक्शन कमिटी भरून त्यात पचरंगी साम न्यात बापूरावाची हिंदु टीममध्यें निवड झाली अनेकानीं कसून विरोध केला पण बापूरावाच्या फॉर्मचे आकडे कोणाच्याहि तोंडात मारतील असेच होते सत्तर ते ऐंशी अॅव्हेरेज आणि शेंकडा नव्वद मॅचेसमध्यें नॉट आउट ! कोणाला यावर आक्षेप घेता येणार ?

बापूरावाच्या खेळाची 'चढती भाजणी' सुरू असली तर बिचाऱ्या बग्या गुप्तेची 'उतरती भाजणी' सुरू होती बापूरावावर चिडून, धास्ती घेऊन त्याचा हात कापे, चेंडूवर नजर बसेना ! शेवटीं डी एम् सी च्या पहिल्या टीममधून काढून पोरासोराच्या 'बी' टीममध्यें त्याची रवानगी करावी लागली.

सर्वांत त्याला असह्य झालेला प्रकार म्हणजे आता हेमलता त्याच्याशीं एक शब्दहि बोलत नसे घरीं तर राहोच, पण रस्त्यात कधीं काळीं भेटली तर त्याच्याशीं शब्द न बोलता, उंच नाक करून, अगदीं समोर पाहात, चट्चट् चपला वाजवीत ती निघून जाई !

पचरंगी सामन्यासाठीं हेमलता आणि बापूराव डेक्कन क्वीननें मुंबईला गेले स्टेशनवर पुण्यातले सारे क्रिकेटप्रेमी लोक हजर होते त्याचा रिझर्व्ह डबा नुसत्या हारतुऱ्यानीं भरून गेला होता. शेवटीं गाडी स्टेशनवरून निघाली. मोकळ्यावर शिरताच बापूराव हेमचा हात धरून भरल्या आवाजात म्हणाला, "हेमा ! हें सार तुझ्या प्रेमासाठीं बर ! नाहींतर या खेळाची मला बिलकुल आवड नाहीं. अन् त्यातल मला अजून काहीं येत नाहीं..."

"तर . तर !" म्हणून हसत हेमलतेनें आपलें डोकें बापूरावाच्या छातीवर टेकलें. "काय बाई तऱ्हा बोलण्याची ! कुणाला अगदी खरच वाटायच हो ! म्हणे मला त्यातल काहीं येत नाहीं ! सारे लोक इतके वेडे केलेत खेळान तें खोटच जसं काहीं !"

बापूरावाचेच शब्द पुन्हा वेडावून उच्चारताना त्याच्याप्रमाणेंच डोळे मोठाले करून गरगर फिरवीत बोलण्याची, नतर जरा रुसून, गाल फुगवून, नाकाच्या दिशेनें खालीं पाहाण्याची हेमाची लकब पाहून बापूरावाला काहींकाहींच होऊ लागले. आणि —

एका मिनिटानतर खडकीच्या स्टेशनवर गाडी उभी राहिली बॅगमधला छोटा आरसा काढून जरा लाजत, त्यात पाहात, हेम आपले केस नीट चोपून बसवून, लिप्स्टिकचा नवा थर ओठावर पसरू लागली

बहुतेकाची कल्पना अशी होती, कीं हा ' पुणेरी तात्या ' पोराच्या मैदानात आडवेतिडवे चेंडू ठोकीत असला तरी चिक्कार भरलेल्या ब्रेबर्न स्टेडियममध्यें तो अगदी नर्व्हस होऊन आयत्या वेळीं बारगळणार ऑस्ट्रेलियाचा एक टेस्ट मॅचचा खेळाडू बापूरावाच्या विचित्र खेळाची कीर्ति ऐकून त्याच्या 'स्ट्रोकस्'ची फिल्म घेण्यासाठीं सिनेकॅमेरा सज्ज करून बसला होता सर्वत्र खळबळ उडाली होती हे मात्र खरें

बापूराव घाबरला होता खराच कोणाहि रिपोटराची त्यानें भेट घेतली नाहीं यावेळीं हेमलतेनेच त्याला धीर देत सावरून धरलें होतें परतु प्रयोगशाळेंत कमावलेले, चालू प्रयोगाकडे पूर्ण लक्ष देऊन बाकीचे जग विसरण्याचें एकाग्रतेचें अवधान त्याला प्रत्यक्ष खेळाच्या वेळीं उपयोगी पडले एकदा पिचवर गेला कीं त्याला प्रेक्षकाच्या साऱ्या जगाचा विसर पडत असे.

त्या पचरगी सामन्यात हिंदु टीमचा प्रारभ फार वाईट रीतीनें झाला सगळीकडे नुसता हाहा.कार उडाला होता. मजहर महमूद आणि निसारच्या तुफान गोलदाजीपुढें सी. के नायडू व मर्चटसारखे मोहरे नामोहरम होऊन त्रिफळा उखडला जाऊन परतले. चार आऊट अन् दहा रन्स ! हा स्कोअर कुणाला विश्वसनीयहि वाटेना ! अशा वेळीं बापूराव खेळायला आला. तोंडात गवताची काडी धरून, अगदीं अजागळपणें पण अचूक रीतीनें, थडपणें तो तुफानी गोलदाजी चोपून काढू लागला.

सों-सों करून अगदीं ऑफ स्टपवर येणारा महमद निसारचा एक कुल्पी गोळ्यासारखा चेंडू एकदा तर त्यानें अगदी सथपणें विकेटपलीकडे

सबध टाग टाकून, चक्क लेगकडे पिटाळला ! ते पाहून साऱ्या क्रिकेट तज्ज्ञानीं तर डोळेच झाकून घेतले ! कॅमेरा बद करून ऑस्ट्रेलियन प्लेअर उद्गारला,

" The devil—the man's no player he's a devil ( माणूस नव्हे, अस खेळणारा सैतानच असला पाहिजे, सैतान ) "

रेडिओवर धावतें वृत्त सागणारा बॉबी तल्यारखान या विचित्र खेळानें हतबुद्ध होऊन " It's marvellous it's glorious but it is not cricket ( अद्भुत खेळ आहे, पण क्रिकेट नव्हे ) " म्हणून नुसत्या विशेषणाचीच अडखळत, अडखळत फैर झाडू लागला

शेवटीं दीडशें रन्स काढून, अजागळपणे धावल्यानें भर पिचवर साष्टाग नमस्कार घालून, रन्-आउट होऊन बापूराव परतला तेव्हा टाळ्याचा एवढा प्रचड कडकडाट झाला कीं, सारे स्टेडियम खालीं आल्यासारखे बाहेरच्या लोकाना वाटले हिंदु टीमचा स्कोअर साडे चारशें झाला होता कारण बापूरावानें सारी बोलिंग आडवी तिडवी चोपून काढल्याने उरलेल्या खेळाडूनाहि स्फुरण चढून त्यानीं ढिल्या पड-लेल्या बोलिंगचा चागला समाचार घेतला

दुसऱ्या दिवशींच्या अनेक वृत्तपत्रात– " Super Bradman in India—( सवाई ब्रॅडमन ), Hindu Cricket wizard's show (क्रिके-टचा हिंदु जादूगार ) " म्हणून मोठमोठ्या मथळ्याखालीं बापूरावाच्या खेळाचें वर्णन आलें होतें सर्व सामन्यातील प्रत्येक इनिंगमध्यें सेंचरी काढून बापूरावानें आतापर्यंत सर्व पचरगी सामन्यातील रेकॉर्डोचा चक्का चूर उडविला ! या अद्भुत विजयानतरही हा विचित्र खेळ काय आहे अन् हा मनुष्य हवे तितके फसवे किंवा बेफाम जोराचे चेंडू अचूकपणें कसे टोलवितो याचें रहस्य मात्र कोणाला कळेना !

मुबईच्या शौकीन शेठियानीं हिऱ्याच्या अगठ्या, हजारहजाराचे चेक्स, सोन्याच्या छोट्या बॅटी, वाटेल त्या मौल्यवान् वस्तु त्या विजयाच्या बेहोष आनदात बापूरावाला अर्पण केल्या.

सामन्याचा बक्षीससमारभ आटोपला त्याच सध्याकाळीं " A Sportsman's choice ( खेळाडूची निवड ) " म्हणून सर्वत्र हेमलतेचे फोटो

प्रसिद्ध झाले यामुळें बापूरावाकडे वाहणारा देणग्याचा प्रवाह हेमलतेकडेहि वळला. श्रीमंत भाटिया स्त्रियानीं वाळकेश्वर, मलबार हिलवरील बंगल्यांत तिला चहा पार्ट्यांचे आमंत्रण देऊन मोत्याच्या बांगड्या, बाजुबंद, आंगठ्या, सोन्याच्या साखळ्या वगैरे अनेक गुजराती अलंकाराचे आहेर केले युरोपियन जिमखान्याकडून 'Bapurao and fiance' (बापूराव आणि त्याची वाग्दत्त वधू)' याना ताजमहाल हॉटेलमध्ये पार्टी देण्यांत आली हिंदु जिमखान्याने महाराज ××× यांच्या 'पवन महालात' श्रीखंड-पुरीची मेजवानी दिली लवकरच विलायतेस जाणाऱ्या हिंदी टेस्ट मॅच् मधून जाऊन हिंदी क्रिकेटचा झेंडा एम् सी. सी च्या कलशावर बापूरावाने रोवावा अशी आशा प्रदर्शित केली त्याचवेळीं आपल्याला कॅप्टन करीत असलात तर आपल्या खर्चानें टीमला विलायतला नेतों म्हणून 'विचित्रनगरम्'च्या राजेसाहेबाची तार आली या सर्व देणग्यामुळें मूळचा कफल्लक असणारा बापूराव आता सहज पाच दहा हजाराचा धनी झाला होता आणि पुढें ?

बापूराव पुण्यास परत निघण्याच्या दिवशीं सकाळीं गम्मत म्हणून 'केनेडी सीफेस्' वर स्त्री-पुरुषाचा एक मिश्र क्रिकेटचा सामना ठरविण्यात आला होता त्यात हेमलतेने फेकलेल्या एका वाकड्यातिकड्या चेंडूनें बापूरावाच्या जाड निळसर काचेच्या चष्म्याचा चकाचूर उडून सर्वत्र खूप हशा पिकला !

चष्मा फुटल्यामुळें साहजिकच बापूराव बोल्ड जाऊन परत आला. परंतु त्याच्या आउट होण्याचेंहि स्त्रीदाक्षिण्य म्हणून सर्वांनीं कौतुकच केलें.

पुण्याला परत आल्यावर पहिल्या मुहूर्तावरच बापूराव आणि हेमलता यांचा विवाह झाला

आणि दुसऱ्या दिवसापासून पुन्हा पहिली लांबलचक पांढरी कफनी घालून बापूराव प्रयोगशाळेत 'ऑप्टिक्स' चें (दर्शनशास्त्र) संशोधन करू लागला.

पण सर्वांना आश्चर्य नव्हे, संताप मात्र आला एका गोष्टीचा. सान्या जिमखान्याचीं शिष्टमंडळें जाऊनहि बापूरावानें मुंबई सोडल्यापासून

क्रिकेटच्या बॅटीला स्पर्शहि केला नाहीं गेल्या सामन्यात आपल्या हाताची शीर कायमची लचकून हात अधू झाल्याची सबब तो सागत असे. पण प्रयोगशाळेंतल्या खिडकींतून बराच वेळ टेहळणी करून एका एफ् आर. सी. एस् सर्जनन स्पष्ट सागितलें कीं, प्रयोगात इतका तल्लख आणि हलक्या रीतीने चालणारा हात अधू असणें शक्यच नाहीं हे निव्वळ ढोंग आहे

हेमलतेचीहि बरीच निराशा झाली प्रथम ती क्रिकेटच्या निमित्ताने बापूरावाकड आकर्षित झाली आणि त्याच्या क्रीडानैपुण्याने व मानमरातबानें तिलाहि धन्यता वाटली परतु या काळात बापूरावाचा प्रेमळ, नि:स्वार्थी, भोळा स्वभाव आणि त्याचे अनिवार प्रेम याची जाणीव होऊन तिने त्याला प्रेमाच प्रत्युत्तर दिले होते यामुळें बापूरावाला भीति होती त्याप्रमाणे तिने फारसे आकाडताडव केलें नाहीं किंवा क्रिकेटच्या वेडामुळें त्यानें या बाबतींत निराशा करताच त्याचा त्यागहि केला नाहीं.

शेवटीं ऑप्टिक्सचें सशोधन पुरे होऊन बापूरावाला डी एस्सी. ही पदवी मिळाली आणि एका सरकारी कॉलेजात त्याची भारी पगारावर प्रोफेसर म्हणून नेमणकहि झाली

बापूरावाच्या या विचित्र क्रिकट–विक्रमात काहींतरी काळेंबेरे आहे असा त्याच्या अनेक मित्राना सशय होता त्यापैकीं एकाने बापूराव नोकरीवर रुजू होण्यास निघताना त्याला चहाचें आमत्रण देऊन, फराळाच्या वेळीं अगदीं स्पष्ट प्रश्न केला

सबध करजी आडवी आत जाईल असें नेहमीचे अर्धचद्राकृति हास्य करीत बापूराव फराळावर ताव मारीत होता त्याच्या चेहऱ्याकडे पाहून तो मित्र म्हणाला — " अरे, आता हा गोल्डन फ्रमचा बारीक काचाचा चष्मा कसा आला रे ! खेळताना तर तू जाड निळसर काचाचा भला मोठा चष्मदेव घालीत होतास ! "

बापूराव हसत म्हणाला, " त्या चष्म्यामाग एक फार मोठ रहस्य होत केनेडी सीफेस्वरच्या खेळात त्या चष्म्याचा चक्काचूर झाला आणि त्याबरोबर औटघटकेच्या सवाई ब्रॅडमन बापूरावाचीहि इतिश्री झाली

समज! तू माझा लहानपणापासूनचा जिगर दोस्त म्हणून तुला सांगतों, कुठं बोलू नकोस–बाकी बोललास तरी कोणी यावर विश्वास ठेवणार नाहींत, तुलाच मूर्खांत काढतील ! ”

त्या मित्राला उलगडाच होईना ! “ अरे, पण चष्म्याचा अन् क्रिकेटच्या खेळाचा काय संबंध आहे ? ” त्यानें विचारलें.

उत्तरादाखल बापूरावानें जवळचें कोरें पॅड जवळ ओढून त्यावर काहीं आकृति काढीत सांगितलें,

—“ हें बघ, मी ‘ ऑप्टिक्स् ’ वर संशोधन करीत होतों हें तुला माहीतच आहे या शास्त्रात डोळयाला दिसणाऱ्या दृश्याचे नियम, अपवाद, दृश्याच्या विकृति, चमत्कार, त्याचं गणित—दुर्बिणी, सूक्ष्मदर्शक यांचे गुणधर्म–प्रकाशाचे नियम–प्रसरण–परावर्तन वक्रीभवन . ”

“ छे छे छे ! ” म्हणून त्या मित्रानें कान झाकून घेतले “ मलों ! ठार झालों या शास्त्रीय परिभाषेनं ! तुझं ऑप्टिक्सचं ज्ञान कॉलेजच्या पोरांना कोळून पाज, मला नको ! तुझ्या क्रिकेटच्या पराक्रमाची मखली काय ती सांग मला ”

“ तेंच तर सांगत होतों जरा दमानं घेशील ? ” बापूराव उत्तरला, “ आपल्याला दिसणाऱ्या दृश्याचे नियम, अपवाद आणि दृष्टीचे आभास यावर मी संशोधन करीत होतों त्यासाठीं निरनिराळ्या प्रकारच्या काचा घासून अंतर्वक्र ( Concave ), बहिर्वक्र ( Convex ) करून त्यातून दृश्य पाहून मी टाचण करीत असें एके दिवशीं मला एक विचित्र काचेचा तुकडा टेकडीच्या खालील खड्डयात सापडला. तो निष्काळजीपणानं जरा घासून पाहू लागलों तों काय चमत्कार ! प्रयोगशाळेच्या बाहेर वेगानं उड्या मारणारा आमच्या माळयाचा कुत्रा अगदीं सावकाश, हवेंत तरंगत वरखालीं होत आहे असं दिसू लागलं ! टेनिस-बॉक्सिंगच्या सामन्यातली ‘ स्लो मोशन ’ फिल्म तू पाहिली असशील. प्रत्यक्ष तसं दृश्य दाखविण्याचं ‘ स्ट्रॉबॉस्कोप् ’ या नावाचं एक यंत्रहि निघालं आहे. अशा प्रकारें सारीं दृश्यं अगदीं गोगलगायीच्या गतीनं

हालणारीं मला त्या काचेतून दिसू लागलीं ” मग जरा लाजून, पॅडवर रेघा काढीत बापूराव थाबत थाबत म्हणाला

“ याच सुमाराला मी हेमावरच्या प्रेमान बेचैन झालों होतों पण ती पोर सदान् कदा क्रिकेट अन् क्रिकेटियर याच्यातच दग ! ते शास्त्र तर आम्हाला अगदीं अज्ञात ! मग ? त्याच वेळीं मला लागलेल्या शोधान माझ्या डोक्यात लख्खन् प्रकाश पडला ! याच काचेचा चष्मा करून मी डोळयावर घातला तर ? अगदीं वेगवान् पदार्थ या काचेतून हळू तरगताना दिसतात, त्याप्रमाण जोरान येणारा क्रिकेटचा चेडूहि अलगद तरगत येताना दिसेल आणि माझ्यासारखा विनसराईतदेखील त्याला सहज अडवून टोलवू शकेल ! इतका हळू डुलत येत दिसणारा चेडू बॅटी पलीकडे जाईल काय बिशाद ! बानर्जी, मजहर महमूद, निसार, रिचर्डस् यानीं पन्नास हात स्टार्ट घेऊन, दात खाऊन फेकलेला चेंडहि मला या चष्म्यातून हवेतून हळूच तरगत येताना दिसे आणि मी त्याचा टप् पडण्याआधीच आरामात त्याला हवा तसा टोलवीत असे

हा चष्मा शेवटच्या स्त्री–पुरुषाच्या क्रिकेट–मॅचमध्यें फुटला आणि माझ्या खेळाचीहि इतिश्री झाली ! बर झाल, मला माझ्या सशोधनाकडे तरी लक्ष देता आल भीति हेमच्या रागाची, पण तीहि माझ्या प्रेमावर सतुष्ट आहे ”

बापूरावाच्या बोलण्यावर त्याच्या मित्राचा विश्वासच बसेना ! तो आश्चर्याने म्हणाला, “ तू म्हणतोस हा प्रकार असला तर घरोघर तुझ्या-सारखे ब्रॅडमनूचे बाप निर्माण होतील तूच पुन्हा तसा दुसरा चष्मा तयार करून हिंदुस्थानाला क्रिकेटमध्यें अजिंक्यपद का मिळवून देत नाहींस ? ”

बापूरावाने मान हालविली “ तू म्हणतोस तसा प्रयत्न मी केला मुबईहून आल्यावर पण व्यर्थ ! मला सापडलेली काच सध्या ज्ञात अस-लेल्या वस्तुतत्वापलीकडील (Elements ) काहीं तत्त्वाची बनलेली असावी. एखाद्या ग्रहावरून आलेल्या उल्केची खालीं पडताना उष्णतेन तयार झालेली काच असावी ही. नाहीपेक्षा गति स्थगित करण्याचा गुणधर्म

आज माहीत असलेल्या कोणत्याहि तत्त्वात नाहीं पुन्हा अशी काच साप डण, ती त्याच अज्ञान घासली जाण अशक्यच जाऊ द्या! गेल तें एक विचित्र स्वप्नच समजतों मी!"

तोंडात सुपारी टाकून उठताना बापूराव म्हणाले, "सार ठीक झाल, पण सारे देशातले क्रिकेटियर माझे कट्टे शत्रु झाले आहेत जो तो क्रीडाद्रोही म्हणून माझ्याकडे बोट दाखवितो हिंदु टीमला अडचणींत टाकून स्वत च्या लग्नासाठीं निघून जाणाऱ्या एका खेळाडूवर माग लोकानीं केली नसेल इतकी टीका लोक माझ्यावर करीत आहेत ही औटघटकेची क्रिकेटची शिराळशेटी मला जन्मभर त्रास देणार पण खर कारण सागितल तर 'अशक्य' अस प्रत्येकजण म्हणणार म्हणून हात दुखावल्याच सोंग कराव लागत मला बर, उद्या मी निघणार क्रिकेटियर असो, प्रोफेसर असो, तुझा बापूराव पूर्वीसारखाच राहील बर का त्याची शका नको तुला.

'ब्रॅडमनचा बाप' म्हणून अल्पकाळ गाजलेल्या बापूरावाचे रहस्य अजून क्रिकेटच्या शौकिनाना बेचैन करीत आहे त्याची खरी कैफियत ही अशी आहे ही लक्षात घेऊन तरी यापुढे टीकाकार बिचाऱ्या बापूरावाला क्रिकेटद्रोही म्हणून शिव्या देणार नाहींत ही आशाच या मोकळ्या कैफियतीच्या मुळाशीं आहे!

( टीप :—शास्त्रीय कल्पना इग्रजीवरून )

---

## ३ : प्रेमाचीं लेणीं

A very good story

ती एक साधी पानवाली होती.

पुण्यातल्या शेंकडो पानपट्टीच्या दुकानासारखें एक टीचभर दुकान होतें तिचें रस्त्याच्या कोपऱ्यावर, हातभर रुंद फळीवर थाटलेल्या दुकानात विशेष तें काय असणार? जेमतेम, पाय आखडून बसता येईल एवढा फाटक्या सतरजीचा तुकडा, काचेच्या तिकोनी तुकड्याखालीं दबलेल्या, हिरव्या, पिवळ्या, काळसर कडाच्या पानाच्या चवडी, लवंगानीं टाचलेल्या तयार पानपट्ट्या, जवळ स्वच्छ घासून ठेवलेलीं लखलखीत पितळेचीं कात चुन्याचीं भांडीं एकावर एक रांगेत ठेवलेल्या, सुपारी लवंग, वेलदोडे, जायपत्री, जर्दा याच्या जर्मन सिल्व्हरच्या वाट्या या शेल्फच्या मागें चौकटीचा सोनेरी रंग उडालेला, काळसर डागाचा एक आडवा आरसा.

विड्या सिगारेटच्या डब्याजवळ, काळाकुट्ट धूर सोडणारा, मंदपणें जळणारा, एक हिरव्या काचेचा छोटा दिवा रात्रंदिवस जळत असे.

तिच्या जीवनाचें प्रतीकच होतें तें.

दुकानामागील धुरकटलेली अंधारी खोली आणि गाजेच्या तारेंत विड्या वळीत नाहींतर फुकीत बसलेला तिचा नवरा हेंच तिचें जग.

तिचें नाव ' राही. '

मावळ प्रांताचा काळा सावळा रंग तिच्या वाट्याला आला असला तरी तिच्या सळसळीत बांध्यात प्रमाणशीरपणाची मोहकता होती. कोंपरावरच्या चांदीच्या वाकीशिवाय तिच्या अंगावर दागिना नसे, पण साधें, दंड घातलेलें लुगडें आणि कोंपरापर्यंतची चोळी हा वेषही तिला शोभून दिसे. खालीं मान घालून ती मांडीवर घेतलेल्या थाळयातील कातरलेल्या पानाच्या विड्या वळीत बसली कीं कितीक लोक तिच्याकडे पहातच मुकाट्यानें उभे रहात त्यांच्या सावलीनें दचकून तिनें वर पाहिलें म्हणजे मग जरा हासून विडीकाडीची मागणी करीत.

दिलेली किल्ली संपल्यावर घड्याळाचे काटे हळू हळू थांबत जावे, किंवा ग्रामोफोनची तबकडी स्थिर व्हावी त्याप्रमाणें तिचे हात हळू हळू थांबून निर्जीवपणें थाळयात पडत. सतत काहींतरी धुंडण्याचा प्रयत्न करीत तिची शून्य दृष्टि समोर लागलेली असे. रात्रीं दुकान लावताना, दिवसाभरात इतक्या कमी विड्या झाल्या म्हणून तिला रोज नवऱ्याच्या हातचा मार खावा लागे

हें कारण वरवरचें असलें तरी तिच्या आळशी, ऐतखाऊ नवऱ्याच्या रागाचें खरें कारण दुसरेंच होते गिऱ्हाइकाशीं एका 'विशिष्ट' तऱ्हेनें वागण्याबद्दल हरबानें तिला कितीतरी वेळा सांगून पाहिले होतें. लालूच, धाक, मार—सारे प्रयोग करून पाहिले त्यानें परंतु नाइलाजानें, नाखुशीनें फक्त विक्रीला दुकानावर बसण्याखेरीज त्या शिकवणुकीचे बाकीचे सारे धडे फुकटच गेले म्हणून तिला शिक्षा करण्यासाठीं हरिबा हल्लीं नव्या नव्या सबबी रोज शोधीत असे.

शेवटीं शेवटीं, तिच्या मूकपणामुळें आणि यंत्राप्रमाणें निरुत्साही, निर्जीव वागण्यामुळें तर तो तिला वेडसरच समजू लागला होता. काहीं तरी कारण काढून तिला हाकून द्यावें आणि आपला मार्ग मोकळा करून घ्यावा याबद्दल त्याची खटपट चाललेली असे.

सध्याकाळची वेळ होती

—' एक पिंवळा हत्ती '

राहीनें सरावाप्रमाणें मान वर न करता पिंवळ्या डब्यातील एक सिगारेट काढून पुढें केली तिची नेहमी भाराबलेली नजर जरा वर गेली. आणि हातातली सिगारेट गळून दुकानाखालीं पडली.

—' कोण किसन ! ' तिच्या तोंडून उद्गार आला.

—' कोण राही !—तू इथें ! ' त्यानें प्रश्न केला

कधीं तोंडून शब्द न फुटणाऱ्या या ' मुकी ' ला आज एकाएकी वाचा फुटलेली पाहून तिच्या पतिराजानें कान टवकारले आणि मधलें दार उघडून बाहेरच्या व्यक्तीकडे रागाची नजर टाकली—आणि तो धड-पडत बाहेर येऊ लागला—खालीं पडलेली सिगारेट उचलून किसन मुका-ट्यानें पुढे चालू लागला तो दिसेनासा होईपर्यंत राहीचे डोळे त्याच्या पाठमोऱ्या मूर्तीकडे लागले होते

त्या रात्रीं तिचा भात बुडीं लागला होता, आणि भाकरीचे कोळसे झाले होते त्याबद्दल रोजच्या रतीबापेक्षा दोन चार अधिक चपराकाचा अधिक खुराक तिला चारून, हरिबा आपल्या नेहमीच्या ' करमणुकीच्या ' ठिकाणीं निघून गेला होता—बाहेरून कुलूप लावून

दोन फाटक्या घोंगड्या, त्यावर जुनीं, फाटकीं लुगडीं, आणि जुन्या कपड्याच्या तुकड्याचीं चौकोनी ठिगळं शिवून तयार केलेली चौघडी हें अथरुण पसरून राहीनें उदासपणें अंग टाकलें टिनच्या डब्यातील बिन काचेची वात काळाकुट्ट धूर सोडीत त्या टीचभर खोलींत उजडाइतकाच अंधारही पसरीत होती त्या काळसर लाल ज्योतीकडे शून्यपणें पहात असता राहीचे पाणावलेले डोळे मिटले

  

. . चहूकडे लख्ख ऊन पडलें होतें. सगळीकडे पूर्ण शांतता होती. थेट क्षितिजापर्यंत लांब पसरत गेलेले आगगाडीचे रूळ सरपटत जाणाऱ्या दोन काळ्याभोर नागिणीप्रमाणें उन्हांत तळपत होते. उजवी-कडे दूरदूर, निळसर प्रकाशात कार्ल्यांच्या लेण्याचा काळाकभिन्न खडकाळ

डोंगर, डावीकडे सपाट मेजासारखा 'विसापूर' आणि त्याच्यासमोर चौरगासारखा चौकोनी लोहगडचा किल्ला ...

रेल्वेच्या रुळाजवळ, गवताळ दरडीवर, गजलेल्या घासलेटच्या पत्र्यानीं आकारलेल्या काहीं मातीच्या झोपड्या कशाबशा उभ्या होत्या. झोपडीच्या दारातून, फाटका परकर नेसलेली एक मुलगी हातात एक कोंकरू घेऊन बाहेर आली तिच्या तोंडावर पिंगट झिपऱ्या उडत होत्या. आणि हातात ॲल्युमिनमच्या दोन बागड्या होत्या

—'ए किसन्या!'

—'काय ग राहू!'

फाटकी पैरण घातलेला, लगोटी नेसलेला एक मुलगा तिच्या हाकेनिशी बाहेर आला शेळ्या, करडें चारीत ती दोन पोरें 'इद्रायणी' काठच्या लहान लहान टेकडावरून दिवसभर भटकत असत

रानात दगडाची चूल करून, तिनें हिरव्या करवदाची भातुकली शिजवावी, चिध्यानीं झाकलेलें एखाद्या दगडाचें बाळ करून त्याला जोगवावें ते कधीं हसत—कधीं रुसत—खेळत—गोष्टी सागत जवळून कर्कश शिटी फुकीत, धाड् धाड् करीत आगगाडी चालली कीं कुपणाच्या तारावर उभें राहून, काहींतरी ओरडत ते हात हलवीत, डोळ्याना हात लावून ती गाडी नजरेआड होईपर्यंत तिकडे पहात करवदें, तोरणें, कैऱ्या तोडून आपल्या शिदोरीबरोबर खात . साजावल्यावर करडाप्रमाणेंच उडत बागडत त्याच्याबरोबर झोपड्याकडे परत येत . ..

हीं बाळपणच्या आनदी, बेफिकीर जीवनाचीं चित्रें राहीच्या निद्रिस्त डोळ्यापुढून जात होती झोंपेतच ती दुसऱ्या कुशीवर वळली...

.. किसन आता तावडें मुडासें घालून 'बाप्यावानी' रोज चार मैल दूर असलेल्या रेल्वेच्या कारखान्यात कामासाठीं जात असे सकाळीं सात वाजता कारखान्याचा भोंगा वाजे, आणि शिदोरीची शिंकाळी घेऊन, झपझप पावले टाकीत किसन रुळाच्या बाजूने कामाला जाई.

कास मारून नेसलेली, गुढग्यावर आलेली साडी, आणि कोंपरा-

पर्यंत येणारी चोळी हा आता राहीचा वेष होता दररोज सकाळीं गाण्याच्या भरात लांब लांब पावलें टाकीत जाणाऱ्या किसनच्या पाठमोऱ्या आकृतीकडे ती झोंपडीच्या दाराआडून पहात असे अगदीं दूर, तावडें टिंब दिलेल्या एका काळसर काटकी इतकी त्याची आकृति लहान होईपर्यंत तिची टेहळणी चाले, नतर आत येऊन ती भाकरी थापू लागे

सध्याकाळीं साडेपाच वाजता कारखान्याच्या सुटीचा भोंगा होई तो राहीच्या झोंपडीपर्यंत ऐकू येई कामकरी खेड्याखेड्यातल्या घराकडे परत जात किसनची चाल आता राहीच्या इतकी ओळखीची झाली होती कीं दुरूनही, इतर कामकऱ्याच्या घोळक्यातून ती त्याला नेमकी ओळखून काढी घरीं आल्यावर एका घासलेटच्या डब्यात तापविलेल्या गरम पाण्यानें झोंपडीमागील दगडावर आघोळ करून तो कारखान्यात अगावर चढलेला काळा तलकटपणा काढून टाकी काळ्या खडकाप्रमाणें रुद, भरदार, छाती आणि त्यावर गळ्याशीं रुळणारा मारुतीच्या चदेरी ताईताचा गोफ हनुवटी ओंठावरची लव, कपाळाच्या दोन्ही बाजूनीं आत गेलेल्या केसाचा, खेड्याच्या नापिताने केलेला 'चेहरा' या थाटातल्या किसनकडे राही कितीतरी वेळ आपल्या दाराआडून पहात उभी राही कधीं कधीं आपल्या झोंपडीमागे तिचें काहीं काम याच वेळीं नेमके निघत असे हसून हातानें उडविलेले पाण्याचे तुषार, नाहींतर इकडे तिकडे पाहून चटकन् टाकलेली चूळा तिच्या अगावर पडे. लाजेने चूर होऊन, पण मनात हसत–हसत ती झोंपडींत पळून जाई.

जवळच्या डोंगरावरील कार्ल्याच्या लेण्यात दर नवरात्रीं 'एकवीरा' देवीची प्रचड यात्रा भरे. वर्षभर ओसाड पडलेल्या या लेण्यात हजारों लोक जमत अगात रेशमी शर्ट, वर निळा सर्जचा कोट, पण कबरेला मात्र एक मोठा रगीत चौकोनी रुमाल अशा वेषातले मुबई कुलाब्याचे भाविक कोळी आणि काहीं प्रभू याची सान्या लेण्यात गर्दी होई मार लेल्या बोकडाच्या 'निवदाचे' ढीग पडत.

मुले कडेवरून नेण्यासाठीं पायथ्याच्या खेड्यातील बायकाना, आणि खुर्च्यांवरून श्रीमत दुबळ्याना उचलून नेण्यात किसनसारख्या जवानांना

चागळी प्राप्ति होई. हजारो वर्षांपूर्वी बौद्ध भिक्षूनीं मुंग्याप्रमाणें खपून, काळ्याकभिन्न खडकातून कोरून काढलेले, बिनसाधी फत्तराचे राजवाडे तेथें उदासपणें उभे होते. साऱ्या डोंगरभर पसरलेल्या लहान लहान टाक्यातील पाण्याचीं शेवाळीं त्या वेळात जरा दूर होत, आणि पुन्हा पसरत–तीं वर्षभर.

एका प्रचंड उभ्या खडकातून कोरलेल्या, आडवाटेच्या, गुहावजा लेण्याच्या खोलींत किसन आणि राही शिदोरी सोडून बसले होते बाळपणच्या दिवसाच्या आठवणी काढून राहीला हसविण्याचा किसनचा प्रयत्न चालला होता ती मात्र अगदीं खिन्न होऊन, पायाजवळच्या काड्या तोडीत, मान खालीं घालून बसली होती

शेवटीं ती हळूच म्हणाली '—किसन! आई म्हनतीया, उद्या पाहुन येनार हैती बाबा म्हनत्यात लगीन करनार माज कुना शहरच्या बाप्याशीं अन्–अन्—आईन दुसरबी सागितल काहीं ”

किसनच्या हातातून भाकरीचा तुकडा गळून पडला—“ काय सागितल आईन तुज्या? ”—त्यानें विचारलें

राही हळू हळू कष्टाने म्हणाली—' आई म्हन—किसनशीं बोलू नग फार—फिरू नग त्याच्या सग आपुन मराठ–– तो अहीर—लोक नाव ठेवत्याल. जात बुडल '

'––तवाच म्हटल— राही बोलत का न्हाई आताशा आता राही व्हनार मोठ्या शहरची— मग या किसनची कशाला आठवन व्हइल?'

'—अस बोलू नकोस किसन— माझा जीव ठावा हाय तुला— कुठबी ग्येले, तरी माज्या किसनला कदी न्हाई इसरायची '

'—वहा देवीची आन!'

'—देवीची आन!'

किसननें तिचे डोळे पुसले

निळ्याभोर आकाशांत कर्कश शीळ घालून घारी झेंपावत होत्या. खोल खालीं पसरलेलीं हिरवीचार शेतें लेण्यावरून सोंगट्याच्या पटासारखीं दिसत होतीं. साऱ्या शांत निस्तब्ध देखाव्यात सुखाची हुरहूर भरली होती. किसनच्या खांद्यावर डोकें टेकून राहीनें डोळे झाकून घेतले.

'असच ठेवीक कां देव सदाच !' हे तिचे अस्फुट शब्द त्यानें ओंठानीं टिपून घेतले.

❦ ❦ ❦

या इश्यानें झोपेंत हसणारे राहीचे ओंठ नतरच्या देखाव्यानें रडवे होऊन खालीं वळले—ती थरारून शहारली-आणि तिच्या तोंडून कण्हण्याचा आवाज आला—

तिच्या झोपडींत आलेल्या 'पाव्हन्याच्या' कानात कोणी चहाडखोरानें विष ओतलें होतें त्याच डोळे लाल झाले होते. राहीला अभद्र शिवी हासडून, तिच्या बापाची कुळी उद्धारून ते चालते झाले—

—आणि राहीच्या पाठीचें धिरडें झालें.

किसन आणि त्याचा बाप एकीकडे, आणि राहीचा बाप अन् एक शेजारी दुसरीकडे-याची हाणामारी चालली होती. दोन्हीकडच्या बायका झोपड्याच्या दारात उभ्या राहून, एकमेकीकडे लांब हात करून अभद्र, अश्लील शिव्या देत होत्या

दुसऱ्या दिवशीं जवळच्या स्टेशनावरून, मुंबईच्या एका नातलगाकडे किसनची कायमची रवानगी करण्यात आली. राही हुंदके दाबीत, दाराआडून त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात उभी होती—

किसननें मागें वळून उसासा टाकला—आणि तो स्टेशनची वाट चालू लागला—

राहीनें झोपेंतच किंचाळून हाक मारली

किसन !.....

❦ ❦ ❦

तिच्या कंबरेंत दाणकन् एक लाथ बसून ती जागी झाली. हरिबा झोकांडे खात, भिंतीच्या आधारानें उभा होता. त्यानें लटपटत पुन्हा दुसरा पाय उचलला आणि भेसूर चेहरा करून, दात खाऊन विचारलें,

'कोन ग तुझा हा किसन रा.........?'

तिच्यावर लाथाचा वर्षाव झाला.

यथेच्छ मारून हातपाय दुखल्यावर हरिबानें तिला फरपटत आणून, दाराबाहेर लोटून देऊन दार लावून घेतलें

सकाळपर्यंत राही तशीच रडत बाहेर पडून राहिली होती.

—दुसऱ्या दिवशीं तिच्या वडिलाकडे तिची रवानगी करण्यात आली.

—तिसऱ्याच दिवशीं, दिवसभर पट्टी चघळणारी, गिऱ्हाइकाकडे तिरव्या डोळ्यानें पाहून हसणारी एक नखरेल बाई दुकानात राहीच्या जागीं येऊन बसली

—आणि एका महिन्यात हरिबाच्या डोक्यावर लफ्फेदार रेशमी कोशा आणि अंगावर रेशमी शर्ट चमकू लागले

❦ ❦ ❦

काल्यांला वडिलाच्या लहानशा शेताच्या बांधावर बसून, राही स्वप्नासारख्या गेलेल्या मागील दिवसाचे विस्कळीत विचार गोळा करीत होती. तिला घेऊन आलेल्या हरिबाची किती समजूत केली होती तिच्या वडिलानीं!

आपले किडुकमिडुक विकून त्याला एखादा डाग करून देण्याचीही तिच्या आईनें तयारी दाखविली—डोळ्यात पाणी आणून वडिलानीं पदर पसरला '—अजाण है प्वार आजून—आपुनच घ्याया होवी साभाळून—कसबी करून ' पण या साऱ्यावर, कपाळाला आठ्या घालून हरिबानें एकच उत्तर द्यावें—

—' ती मला मेली अन् मी तिला मेलों असली घुमी, येडसर नी बदचालीची आवा नको मला '

जवळच्या खेड्यातून जमलेल्या जातीच्या पचासमोर त्यानें तिला काडी मोडून दिली.

त्या दिवसापासून जिवत असून राहीला मेल्यासारखें वाटत होतें.

तसें म्हटले तर लग्नाच्या दिवसापासून तिला सुखाचा क्षण दिसला नव्हता. नवऱ्याच्या माराचे वळ अंगावर, आणि कठोर बोलण्याचे वळ मनावर अजून उठून दिसत होते. त्यानें केलेल्या भलत्या सूचनानीं अजून

तिचें अंग शहारत होतें-तरी पण अशाही ससारातून घालवून दिल्यानें ती खरोखरच वेश्यासारखी झाली होती

जखमी झालेल्या पाखराला सारे पक्षी एकत्र होऊन, टोंचून टोंचून मारतात, तसेंच दुर्दैवानें समाजावेगळया पडलेल्या व्यक्तीलाही निंदेच्या टोंचण्यानीं समाजातले खुनशी लोक घायाळ करतात–हा प्रकार सर्व समाजात एकच मग तो समाज हजारो हवेल्याच्या शहरचा असो किंवा चार झोंपड्याच्या खेड्यातला असो

या निंदेनेच जीव उबगून जाऊन राही आता जगाला पाठमोरी झाली होती—प्रत्यक्ष किसनलाही काडीमोड केल्यावर किवा विधवा झाल्यावर 'म्होतुर' लावणे ही गोष्ट कुणबाऊ जातींत नेहमींच्या शिरस्त्याची असली तरी ती गौणपक्ष म्हणूनच समजली जाई राहीच्या आशेवरच किसन रजा काढून मुबईहून धावत आला होता

स्वप्नात काढलेल्या किसनच्या नावाचें निमित्त होऊन राहीला आपल्या ससारावर पाणी सोडावें लागले होतें पण आता तो प्रत्यक्ष समोर उभा राहूनही त्याच्या लग्नाच्या विनवण्याना तिच्या डोळयातल्या पाण्यानेच उत्तर मिळे भोळया किसनला हा काय प्रकार आहे हें कळत नसे परत जाण्याच्या दिवशीं त्याने तिची शेवटली गाठ घेतली. तिचे खरे विचार काढून घेण्यासाठीं तो मुद्दाम जरा रागानेंच बोलत होता

'—सार—सार खोट! दुनियाच खोट्याची, तू बी तशीच निगालीस राही! इत्का इस्वास ठेवला तुज्यावर, पन् तुजी मागली मायाबी खोटी इक्ता जीव टाकतों मी तुझ्यापायीं, पन तुला मारून, झोडून, वगाळ बोलून हाकलून देनाऱ्या हरिबाची सयबी तुला माज्यापरीस ज्यास्ती. असचना?"

—-पचप्राणानीं टाहो फोडून मागितलेली वस्तु शेवटीं हातात येऊनही निश्चयानें तिचा त्याग करणाऱ्या निर्धारानें राहीनें कष्टानें मान फिरविली—ती जड आवाजात म्हणाली—

—' छळू नगस असा किसन! देवाची आन, कदी इसरलें न्हाई तुला. तुज्या नावापायीं घर बुडल माज, पन आता मोकळी होउनबी

दुसरा घरठाव कराया जीव व्हत न्हाई माजा. कुनीतरी माग वढल्यागत व्हत मला. रातभर तळमळत पडल्यें ' काय करू— काय करू म्हनते पन तुझ्याशीं म्होतुर लावावा म्हटल, कीं मनात कुनीतरी बराडल्यागत व्हत–'माग फीर–राही माग फीर'–अस ! किसन–माज ऐक वेडीचन्नी जरा. किती दीस रहानार तू असा ? आता मिळवता बापई झालास तू सुखान कुना नव्या नवरीशीं ससार कर. मी बगन अन् डोळ निवतील माझ.'

—" कदी व्हनार न्हाई अस —माझ्या राहीबिगर मला दुनियेंत दुसरी कोनबी बाइल नको " एवढेंच नेहमीं किसनचें उत्तर असे. शेवटीं रजा सपल्यामुळें तो निराशेन मुंबईला गेला

मुंबईत त्याच्या गिरणीतले सोबती त्याला अनेक मोह दाखवीत. बाई–बाटलीची मौज आपल्याबरोबर त्यानें चाखावी म्हणून मुद्दाम त्याला नाना तऱ्हेनें छेडीत. कधीं कधीं साऱ्या मर्यादा सोडून, आपणही या लोकाप्रमाणें बेहोष व्हावें–सारें विसरून चैन करावी असा त्यालाही मोह होई–पण अशा वेळीं त्याच्या डोळ्यासमोर राहीची करुण, आकर्षक, मूर्ति उभी राहात असे–आणि आपल्याच मोहाची लाज वाटून तो या साऱ्या प्रकारापासून दूर रहात असे. याबद्दल त्याचे सारे सोबती त्याची मनसोक्त चेष्टा व उपहास करीत.

तो गेल्यावर राहीलाही आपण दिलेल्या नकाराचा कितीकदा पश्चात्ताप झाल्यासारखा वाटे. सारें मागचें जीवन विसरून, लग्न करून त्याला सुखी करावें असा तिला उमाळा येई. एकदा तर तशा मजकुराचा 'कागुद' लिहिण्यासाठीं ती दोन मैल दूरच्या खेड्यात एका 'लिवनाऱ्या' भटाच्या उंबरठ्यापर्यंत गेलीसुद्धा–पण पावलागणिक तुटलेल्या संसाराच्या बेडीचा कर्कश खळखळाट तिच्या कानात घुमत होता. त्या घराच्या उंबरठ्यापर्यंत जाऊनही पदराआड लपवून नेलेलें 'कारट' तसेंच कोरें घेऊन राही जड पावलानीं आपल्या झोंपडींत परत आली

अशा विचाराच्या झुलीतच दोन वर्षें लोटलीं. राहीच्या तोंडावरचा तजेला कमी कमी होत आता त्यावर सुरकुत्या पडू लागल्या होत्या— अगमेहनतीनें आणि निराशेनें मुंबईला किसनही खंगत चालला होता.

पुन्हा नवरात्राचा सण आला.

भोंवतालचे सारे डोंगर थेट माथ्यापर्यंत पाचूसारख्या हिरवळीन झाकले गेले. काळ्याकभिन्न खडकाच्या सुळक्यावर, आणि हत्तीसारख्या प्रचंड शिलाखंडावरही मखमलीसारखी शेवाळाची हिरवळ फुलली होती गुढगाभर पाणी साचलेल्या शेतातून हिरवेंगार भात डोलत होतें. रेल्वेच्या रुळाच्या बाजूनें पायवाटानींही गवतातून बारीक बारीक बिनवासाची पिवळीं फुलें वर डोकावत होती पायाखालीं चेंगरणारीं जाड मऊ पानाचीं रानओव्याची झुडपें पावलागणिक चालणाऱ्याना उग्र, तिखट वासानें बेचैन करीत होती नजर फेंकावीं तिकडे सारें हिरवेंगार आणि थडगार वाटे—पण राहीच्या उरातली आग मात्र अजून धगधगत होती—

पावसाळी हवेच्या तापाने मरणाच्या दारीं टेकलेला किसनचा बाप आता कसाबसा बरा झाला होता त्यासाठीं केलेला आईचा नवस फेडण्यासाठीं, देवीला बकरे देण्यासाठीं किसन मुंबईहून मुद्दाम रजा काढून आला होता चार पैसे गाठीला असल्यामुळें आता त्याला पूर्वीप्रमाणें खुर्च्यांना खादा देण्याची जरूर वाटत नव्हती

राही मात्र फाटक्या लुगड्यानिशीं, श्रीमत, लठ्ठ कोळिणींचीं केंकाटणारीं पोरें कडेवर घेऊन रोज लेण्यापर्यंत चार फेऱ्या करीत असे. देवीपुढें रक्ताचा सडा पडला होता

—' तुला बोल्ला होतान्—घे! '

म्हणून देवीला बजावून, एका घावानिशीं, नवस फेडणारे कोळी बकऱ्याचीं डोकीं उडवीत. असाच आईचा नवस फेडून, किसन मोकळा झाला दुपारी एका मोठ्या लेण्यात किसनचा बाप जरा आडवा झाला. पण कित्येक वर्षांपूर्वीच्या राहीच्या पहिल्या प्रेमभेटीच्या आठवणीनें बेचैन होऊन किसन त्या पडिक आडवाटेच्या लहान लेण्याकडे निघाला.

—या तीन वर्षांत किसन कितीतरी बदलला होता—

—राही तर अगदीं ओळखूही न येईल अशी झाली होती.

—पण हजारों वर्षांपासूनचें, तें एकलकोंडें लेणें मात्र जसें होतें तसेंच उभें होतें.

तीन वर्षांपूर्वी किसन बोलत असता राहीनें जमिनीवरून तोडून, खडकाच्या कोपऱ्यात टाकलेले गवताचे तुकडे, किसनच्या शिदोरी भोंवताली गुडाळलेले चोळामोळा करून टाकलेले कागद—हे सारे अजून तिथंच–काल टाकल्याप्रमाणे पडले होते–वाऱ्यानें इकडचे तिकडे हलले असतील तेवढेच त्या आठवणीनें अस्वस्थ होऊन, डोक्याचे मुडासें काढून ठेवून किसन खिन्नपणें खालीं बसला राहीच्या प्रेमळ भेटीचा तो पहिला प्रसग पुन्हा त्याच्या डोळ्यापुढून जात होता लेण्याच्या दूरच्या अधाऱ्या कोपऱ्यातून एक अर्धस्फुट हुदका त्याला ऐकू आला किसन दचकला–उठून उभा राहिला–त्या दिशेने गेला कपाळावर अस्ताव्यस्त पसरलेले केस, जीर्ण फाटके लुगडें—कृश आणि काळसर हातात तोंड झाकून रडत असलेली राहीची मूर्ति त्याला दिसली दोन वर्षें कष्टानें दाबून ठेवलेल्या तिच्या प्रेमभावनाचा बाघ या पहिल्या प्रेमाच्या स्थळदर्शनाने फुटला होता या प्रेमाच्या लेण्याचें दर्शन घेण्यासाठीं तिचे पायही किसनप्रमाणे आपोआप या दिशेला वळले होते

"—राही ! माजी राही ! आता किती जीऽ आटवनार तू ? सारा जलम रडून काढनार का आता ?" भावनाकातर स्वरात किसनने विचारलें–"राही ! द्येवाची आन ! तीन वर्स ममईत काढलीं—कितीक रुपाच्या बाया पघितल्या असत्याल, पण माज्या राहीची मूरत न्हाई हलली डोळ्या पुढली. तुज लगीन झाल—आता तू दुसऱ्याची म्हणून तुला इसराव म्हटल–पन दीस गेला नाहीं तुज्या आठवनी बिगर. अन् आता त्या फासातून मोकळी होऊनबी नुसता 'राही ! राही !' करीत तळमळत ठेवणार का जलम भर ! सार आठवत अजून, बाळपणापासूनच. म्या इचाराव 'राही कुनाची ?' अन् तू हसत सागाव—'किसनची' ! आता येकदा तरी बोलशील का तस फिरून ! का त्ये सार इसरलीस शेहरात जाऊन ?"

त्याचे शब्द तिच्या दुखावलेल्या हृदयाला तीरासारखे लागले. तिचे डोळे पुन्हा भरले कितीतरी वेळ ती निमूटपणे बसली होती शेवटीं म्हणाली—'द्येवान दिलेल्या कारभाऱ्याच्या नावान हळद लावली त्या दिसापून जिवाभावान त्याच्याशीं वागलें–बटकीसारखी त्याची चाकरी

कली मार झोड केली तरी बोलल्यें न्हाई कुनाजवळ वगाळ बोकनची ऐकून सोडून दिल—ज्याच पाप त्येच्यापाशीं माज्या देखत त्यानीं बाजारची बया आनून घरात नाचविली—तरीबी धर्मान धरून राहिल्यें त्येना—त्यानींच दूर क्येल लाथेन मला—सार खर—पर इसरू म्हटल्यान् इसरत न्हाई मागला ससार माजा जीऽ तुज्यावर असला तरी बी 'मी किसनची' पुन्हा म्हनाया जीभ वळत न्हाई माजी बाबा काय म्हनत्याल?—लोक काय म्हनत्याल?'—किसनचा चेहरा गोरामोरा झाला तो उठून आवेशानें म्हणाला—'लोक काय म्हनत्याल!—राही—काय म्हनायच त्येवलय् लोकानीं कीं आता त्यची भीड धराया होवी?—अगदीं इतकी निर्मोळपणान वागलीस तू तरी बग येकदा लोक तुला काय काय नाव ठेवतात ते! त्य आता काइबी ऐकनार न्हाई—मी आता राही कुनाची बाइल न्हाइली न्हाई—माजी है ही राही—तू म्होप जलमभर जीव जाळशील, परमी न्हाई जाळू देनार! येकमेकासग राहून ससाराच सोन करू आपन. जीव वोंवाळून ठवीन तुज्यावरून राही! पर आता न्हाई रहावत तुज्या विगर "

देघाच्याही तोंडून भावनावशतेनें शब्द फुटेना राहीच्या मनात भावनाचें महाभारत चालले होते तुटक्या लग्न-बंधनाचा मनावर उरलेला काच, प्रेम, लोकलज्जा, जनापवाद, जुने सस्कार इत्यादिकाचे अर्धवट, अस्पष्ट विचार तिच्या मनात थैमान घालीत होते शेवटीं एक उसासा टाकून ती उठून उभी राहिली--

'—चल किसन! माजा जीव तर करपला—पर तुज्यापायीं येतें तुजी होऊन ने मला आता कुठबी'

साऱ्या जगाचा आनद किसनच्या डोळयातून, तोंडावरून ओसडत होता.

—"येवच बोलला तुझ्या तोंडातून राही! आता माग पाऊल घेऊ नगस माझी राही मला मिळली—आता सारी दुनिया माझी!"

राहीच्या हाताला धरून त्यान तिला आपल्या हृदयाशीं ओढून घेतलें ...

निळ्याभोर आभाळात कर्कश शीळ घालून घारी झेपावत होत्या. खोल खालीं पसरलेलीं हिरवीचार शेतें लेण्यावरून सोंगट्याच्या पटासारखीं दिसत होतीं. साऱ्या शांत निस्तब्ध देखाव्यात सुखाची हुरहुर भरली होती. किसनच्या खांद्यावर डोकें टेकून राहीनें डोळे झाकून घेतले.

–खालीं जाऊन दोघानीं मिळून 'एकवीरा' देवीला नमस्कार केला वर येताना खालीं मान घालून मुकाट्यानें जाणारा किसन, वरून उतरताना मात्र हसत, लावण्या ललकारीत चाललेला पाहून त्याच्या बापालाही नवल वाटलें.

राहीचा आपल्याशीं म्होतुर लावण्याचा विचार त्यानें तिच्या बापाला सांगितला त्याच्या शिव्या, आईचा आशिर्वाद आणि जात-वाल्याचीं कडवट तिरस्काराचीं बोलणीं– हे सारे प्रकार त्याला सारखेच वाटले.

❦ ❦ ❦

गिरणीची गुलामी सोडून गाठीला बांधलेल्या रकमेवर आता किस-ननें त्याच्या गिरणीजवळच एक स्वतंत्र चहाचें दुकान काढलें आहे.

तुम्ही जर कधीं मुंबईला परळ–लाल बागच्या भागात गेलात तर तुम्हाला तें अजून दिसू शकेल. गिरण्यांच्या धुरकट वातावरणात, कापूस गाठींच्या खटाऱ्याच्या खडखडाटातही एकदा त्या दुकानाजवळ आल्यावर तुम्हाला काहीतरी गूढ रीतीनें, निळ्या आभाळाखालीं हिरवळीवर मोकळे पणानें बसल्यासारखें वाटू लागेल

राही आणि किसनलाही त्याच्या प्रेमाच्या बोलींत, भोंवतालच्या यांत्रिक जगाच्या धडपडीचा विसर पडतो. पुन्हा तो सह्याद्रीचा मोकळा माळ, दूरवर दिसणारा कार्ल्यांच्या लेण्याचा काळा डोंगर, रेल्वेच्या रुळा-जवळच्या, हिरवळीवरच्या पत्र्याच्या झोंपड्या–हें दृश्य त्याना दिसू लागतें.

मात्र लग्नानंतरच्या पहिल्या एका वर्षाची आठवण झाली म्हणजे राहीचें अंग अजून शहारतें, तिची मुद्रा कावरीबावरी होते आणि तिच्या सुखी हृदयातून एक उसासा येतो बिचाऱ्या किसनला मात्र या प्रकाराचें कोडें अजून उलगडत नाहीं

रेशमी साडी अन् हिरे माणकानीं लादलली, मौल्यवान् मोटारींतून जाणारी गिरणीमालकाची बायको या छोट्या दुकानातील सुखी जोडप्याच्या डोळ्यांतलें प्रेम पाहून नेहमीं हेव्यानें उसासा टाकीत जाते.

## ४ : दूरचे डोंगर

१००८.

" पोस्टमन् ! "

बाहेर हाक येऊन, खिडकींतून काहीतरी पडल्याचा टप्कन् आवाज आला, परंतु कागदावर वाकलेले माधवरावाचें डोकें काही वर उचललें नाहीं कागदावरून त्याची लेखणी झरझर चालली होती त्या अनुरोधानें, मध्यभागीं जरा टक्कल पडलेलें त्याचें डोकेंही या बाजूनें त्या बाजूला हलत होतें मनाप्रमाणें कृति घडत असली म्हणजे गुगून मनुष्य डोलू लागतो. त्याप्रमाणें डोलत, माधवराव लेखनात दंग झाले होते.

पलीकडच्या खोलींत रमाबाई आरसा-पेटी समोर घेऊन वेणी घालीत बसल्या होत्या. त्यानीं वर पाहून सूचना दिली.

—' पत्र आलय् कुणाच वाटत-पहायच जरा ! '

पण माधवरावानीं आपल्या डोक्यावरील टकलाला चांचपीत नुसतें- ' हू ' म्हटलें आणि कपाळाला एक आठी घातली पुन्हा त्याचा टाक कागदावरून धावू लागला. क्षण काय वाया गेलेल्या त्या क्षणाची भरपाई म्हणून त्याला दुप्पट दौड करावी लागणार होती.

आपल्या लेखनाच्या धुंदींत साऱ्या जगाला विसरलेल्या पतिराजा

कडे पाहून रमाबाईंनीं एक उसासा टाकला, आणि बाहेर जाऊन तें पत्र उचलून घेतलें डौलदार, भारी, हिरव्या रंगाच्या लिफाफ्यावर फुलांच्या अक्षरात 'वसंत' हें नाव छापलें असून खालीं

'मराठींतील कोणत्याही चार मासिकांपेक्षा अधिक खप असलेलें'

अशी अनाहूत पण संशयास्पद माहितीही ठळक तिरप्या ठशात दडपून दिली होती–तिकडे पाहून रमाबाई म्हणाल्या,

—'वसंत' मासिकाच्या संपादकाचं पत्र दिसतय्

या शब्दानीं मात्र एकदम जादूसारखा परिणाम झाला हातातला टाक टाकून माधवराव एकदम ताडकन् उठले

—'मग अगोदर सांगायला दातखीळ बसली होती का?–आण ते पत्र इकडे अगोदर'—म्हणून पत्नीच्या अंगावर खेकसून त्यानीं तें तिच्या हातातून खसकन् हिसकावून घेतलें. त्याची बाजू टर्रकन् फाडून त्यानीं अधीरपणे आंतील मजकुरावरून दृष्टि फिरविली वाचीत असतानाच आनंदानें, समाधानाने त्याची पहिली रागाची हालचाल आपोआप बंद झाली. त्याचे डोळे लकलकू लागले एखादा अत्यंत चविष्ट पदार्थ आपण अगदीं थोडा थोडा, हळू हळू चाखतों त्याप्रमाणें प्रत्येक अक्षरन् अक्षर, ओळन् ओळ ते वाचू लागले खुर्चीवर मागें रेलून डोक्यावरील केसात लपलेल्या टकलेला कुरवाळीत ते पुढील मजकूर वाचीत होते:—

" . सोबतच्या पत्रावरून आपल्याला समजून येईल कीं आमच्या लोकप्रिय 'वसंत' मासिकात आम्ही पुढील महिन्यापासून अंतर्बाह्य सर्व प्रकारच्या सुधारणा करणार आहोंत. महाराष्ट्रातले झाडून सारे प्रथितयश लेखक, लेखिका, नामवंत टीकावंत, कलावंत, गवैय्ये, बजवय्ये, गायिका, नर्तिका, तारका, सारिका या साऱ्यानीं आम्हाला सर्व तऱ्हेनें साहाय्य करण्याचें कबूल केलें आहे. आमचें मासिक केवळ हिंदुस्थानातच नव्हे तर अलम् दुनियेंत श्रेष्ठ करून दाखविण्याची उमेद आहे. आमचे वर्गणीदार आताच सर्व हिंदुस्थानातच नव्हे तर, युरोप, अमेरिका, चीन,

जपान, तुर्कस्थान, आफ्रिका, आस्ट्रेलिया, देशातही पसरले आहेतच. मासिकाचा व्याप इतका वाढल्यानें आम्हाला एक उपसपादक नेमणें आहे आपल्यालाच म्हणून अगदीं खाजगी रीतीनें कळविण्यास हरकत नाहीं कीं दोन प्रोफेसर, तीन वकील आणि चार डॉक्टर याची या जागेसाठीं मागणीही आली आहे परतु त्याचा विचार करण्यापूर्वी आपल्यासारख्या ध्येयवादी, उत्साही हौशी लेखकालाच प्रथम सधि देण्याचें आम्ही ठरविले आहे

आम्ही सध्या आपणास चाळीस रुपये वेतन देऊ आपण मुबईतील एका मोठ्या एक्स्पोर्ट इपोर्ट फर्मचे हेडक्लार्क आहात, आपणास सव्वाशे रुपये पगार आहे, या गोष्टींही आम्हास माहीत आहेत तथापि वाङ्मयसेवेकडे आपण केवळ पैशाच्या दृष्टीने पहाणार नाहीं अशी आशा आहे "कलोपासना म्हणजे आत्मयज्ञ" या मथळ्याचा आपला जोरदार लेख 'वसत' च्या मागच्याच अकात प्रसिद्ध झालेला असल्यानें आपलीं मते व्यवहारात उतरविण्याची सधि आम्ही देत आहोंत

'वसत' मासिकाचे उपसपादक म्हणून आपण वाङ्मयाच्या आकाशात एकदम धूमकेतूसारखे उदीयमान होऊन हजारो लोकात कीर्तींचे विषय व्हाल हें आम्ही सागावयास पाहिजे असें नाहीं असो– अलमिति विस्तरेण !

चार दिवसात आपले अनुकूल उत्तर येईल अशी अपेक्षा आहे. न आल्यास मात्र ही सुवर्णसधि आम्हाला नाइलाजाने दुसऱ्याला द्यावी लागेल...

आपला—× × ×
सपादक, सचालक, उत्पादक आणि मालक.
**वसत मासिक.**

  

या मजकुराची माधवरावानीं पुन्हा पुन्हा पारायणें केलीं पदवी नसूनही प्रोफेसर, वकील, डॉक्टरापेक्षा आपल्याला अधिक आस्थेनें आम-त्रण देऊन ही मानाची माळ गळ्यात टाकण्याची तयारी दाखविण्यात यावी

याचीच त्याना धन्यता वाटत होती या नव्या मान्यतेच्या सृष्टींत आपण पहाता पहाता बडे लेखक, सर्वमान्य सपादक, कादबरीकार . हो! कदाचित् भविष्यकाळचे साहित्य परिषदेचे अध्यक्षही

इतक्या वर्षांत ही त्याची पहिलीच कल्पना सत्यसृष्टींत उतरत होती वडिलाच्या मृत्यूमुळें उच्च शिक्षणाची आशा सोडावी लागली आणि नोकरी पदरीं आली द्रव्याच्या अभावामुळे सुशिक्षित, सुदर पत्नीची आशा सोडावी लागली, आणि चार यत्ता शिकलेली, काळी सावळी, साधीभोळी रमाबाई पदरीं आली तिच्या आठवणीबरोबर त्याच्या कपाळा-वर पुन्हा आठी चढली त्याची नजर दारापलीकडे गेली

रमाबाई नुकत्याच अग धुवून, आरशापुढे बसून, टळक कुकवाची चिरी लावीत होत्या नेहमीं वस्त्रानीं झाकल्यामुळे आलल्या दड आणि खाद्याच्या उजळपणामुळे त्याच्या हाताचा आणि तोंडाचा सावळेपणा अधिक उठून दिसत होता दातात पदर धरून, वर दड करीत त्यानीं अगात चोळी घातली, तिच्या काठामुळे त्याच्या पाठीवर एक पाढुरकी आडवी रेघच उमटली होती

खाद्यावरचा पदर काढून त्यानीं तो कबरेपर्यंत झटकून, नीट सर सावून अगावर घतला कोनाड्यातील रामाच्या फोटोला नमस्कार करून, पुड्यातलीं फुले वाहिलीं—आणि उरलेलीं दोन कुदाचीं फुले आपल्या अबाड्यात खोवलीं

तीं फुलें म्हणजे आपल्या आयुष्याचें प्रतीकच आहेत असें माधव-रावाच्या लेखक–मनाला वाटू लागले आपल्या जीवनात कुदाचा साधे-पणा, शुचिर्भूतपणा आहे पण गुलाबाचा मादक सुरगी सुगध नाहीं तो मिळण्याची आता आशा . ? माधवरावानीं एक उसासा टाकला, आणि पुन्हा कागदावर डोके वाकविले—पण आता त्या पत्रानें बेचैन झाल्यामुळें त्याना लिहिणें सुचेना. तोंडात एक सिगारेट धरून, डोळे अर्धवट झाकून, वाङ्मयविहाराचीं सुखस्वप्नें पाहात ते बसले होते

. ...भिंतीवरील घड्याळात खर्रकन् आवाज होऊन एक ठोका पडला. साडेनऊ वाजले होते.

माधवरावांनीं आत जाऊन, एक शब्दही न बोलता एक ताट आपल्यापुढें ओढून घेतलें, त्यावर वाटीनें खणखण आवाज केला, आणि तोंडापुढें एक पुस्तक धरलें

रमाबाईनीं त्याच्याकडे एक दीनवाणी नजर टाकली आणि वाढ ण्यास सुरवात केली

दुपारभर कचेरींत टाइपरायटराची टकटक्, टेलिफोनच्या कर्कश घंटेचा आवाज, मॅनजरच्या अर्ध्या काचेरी दारामागून मधून मधून येणारीं बोलावणीं, हुकूम—एक्स्पोर्ट इंपोर्टच्या गिऱ्हाइकाचीं खातीं,—कार्ड इंडेक्स्—मालाच्या रसीदी—हुंड्या, बाजारभावाच्या तारा—या साऱ्या कामाचा ते सराइतपणे यंत्रासारखा निकाल करीत होते

त्याच्या टेबलावरील तारेच्या 'ट्रे' मधल्या, तांबड्या हिरव्या स्लिपा लावलेले जरुरीच्या प्रकरणाच कागद, निरनिराळया खात्याचे रिपोर्ट याचा निकाल लावून त्यानीं एका टाइपरायटरवर स्वत च चार ओळी टाइप केल्या मॅनेजिंग पाटनरच्या खोलीचें अर्धे-दार उघडून ते आत शिरले. रसिकलालने वर पाहून स्मित केले—

"—कसा काय माधुराव! या बसा, खुरशीवर तब्येत ठीक हायने! डोळा जरा लाल दिसते—काहीं नरम गरम नाय् ना?"

रसिकलालच्या या आस्थच्या, मित्रत्वाच्या बोलण्यामुळें माधवराव जरा ओशाळल्यासारखे झाले —काहीं न बोलता त्यानीं टाइपकरून आण- लेला तो कागद पुढे ठेवला त्यावरून नजर फिरवितांच रसिकलाल एकदम आश्चर्यान उठून उभा राहिला—

"—अरे! ये काय लिवला हाय? राजीनामा? काय भेजा खसला के काय? धा वर्सा झाला नोकरी करूनशान ये फर्ममदी, कदी असा वागला नाय तुमी—आज काय झाला! जावा, जावा, गुस्से होऊ नका खाली." म्हणून रसिकलालनें चोळामोळा करून तो कागद खालीं टाकून दिला भांडण्याच्या तयारीनें आलेले माधवराव या आपुल- कीनें सर्दच झाले तरी ते म्हणाले—' आपल्या आपुलकी आणि विश्वासा बद्दल आभारी आहे साहेब—पण मी रागावून हा राजीनामा दिला नाहीं.

सारा जन्म ऑफिसात खर्डेघाशी करण्याची माझी इच्छा नाहीं साहित्य-सेवा करण्याची माझी उमेद, पण त्याच्यासाठीं साहित्याच्याच वातावरणात राहिल पाहिजे-पैशाचा मोह सोडला पाहिजे पुण्याच्या 'वसत' मासिकाच्या उपसपादकाची जागा मला मिळाली आहे त्या नोकरीचे चाळीस रुपये मला इथल्या सव्वाशेपेक्षा जास्त आहेत—लेखन व्यवसायाच माझ ध्येय . "हातातलें पेपरवेट टेबलावर आपटून रसिकलाल चिडून उद्गारला-" लिवते-लिवते-बस्स लिवते समदा—अरे तुम्ही बद्धा मरेठी लोक पागल झाला के काय? जे उठते ते बस लिवतेच— दुसरा कामधदा काय नाय! ये बघा माधवराव! आमी तुमची नाउमेद करायला नाय मागते—पण एटलु ध्यानमदी ठेवा के लिवायचा शोख म्हणून ठीक, पण तेचेवर पोट भरायला बगेल तर लई मोठी भूल होयेल तुमची तुमचेच पेपर बोलते के तुमचे देसमदी समदे फोकट वाचायला मागते—चोपडी वेचाती लेते नाय? मग लेखक लोकला पैसा कसा मिलेल? आमचे देसमदी आमी कोणाची भीख मागून वाचते नाय-म्हणून आमचा कनु मुनशी, रमणलाल देसाई, मेघाणी, धूमकेतू समदा सेकडो रुपिया कमाते चोपडीवर-"

—पण काहीं असो साहेब! मी एकदा निश्चय केला तो केला रजा घेतों आपली

रसिकलालनें उठून त्याच्याशीं हस्तादोलन केले

"— हे बगा! माधवराव! इतका वरस झाला, नोकर नाय, दोस्त समजून आम्ही वागते तुमच्या बराबर आमच्या गुजराती फर्ममदी तुमचेसारखा दक्षणी हेडक्लार्क ठेवला आम्ही आमचा जातवाला गुस्से झाला तोबी अने आता तुम्ही असा एकदम जाते—लई वाइट वाटला आम्हाला— बायडी छोकरावाला आदमी, तुम्ही चाळीस रुपियेंत कसा राहेल?—कसा नवा घर माडेल? फोकट पस्तावा करण्याची वखत येऊ नये सभाळा— कागदपत्र लिवा, भुलन जाऊ नका तुमचे चोपडी अने वार्तामदी"

बाहेर येऊन माधवरावानीं 'वसत' मासिकाच्या मालक—सपादकाला समतीचें पत्र लिहून टाकलें.

अधार पडेपर्यंत चौपाटीवर बसल्या बसल्या मनात आणि वाळत उचउच किल्ले त्यानीं बाधले

   

दररोज साडे नऊ वाजता पाटावर बसून मुकाट्यानें ताट पुढें ओढणारे माधवराव दुसऱ्या दिवशीं अकरा वाजले तरीही स्वयपाकघराकडे फिरकले नाहींत हें पाहून रमाबाई मनात चरकल्या किलकिल्या दारा तून त्यानीं पुढल्या खोलींत नजर टाकली, आणि 'पान वाढलय् केव्हाच' म्हणून हळूच सूचना केली

जेवीत असता एकदोनदा खाकरून शेवटीं माधवरावानीं एका दमात सारें सागून टाकले—' हे पहा, आजपासून ही मुबईची नोकरी मी सोडली आहे. परवा पुण्याला जायचय् आपल्याला—तयारीला लागा अन् सागून ठेवतों, पहिल्या पहिल्यानें पैशाची ओढाताण होईल जरा सव्वाशाऐवजीं चाळीसच रुपये येणार आहेत आता घरात—तेव्हा हात आखडता घ्या सगळीकडे . ह पुरे—आपला उपदेश नको आहे माझ नेहमीच सागण आहेच मी हा आहे असा आहे पटेल तर रहायच—नाहींतर माहेरीं मायचीं माणस वाट पहात असतील, तिकडचा रस्ता मोकळा आहे ..' म्हणून आचवून त्यानीं तडक बाहेरच्या खोलीचा रस्ता धरला.

माधवराव रागावून उठून गेल्यावर, रमाबाई त्याच पानात जेवायला बसल्या ताटातले खरकटे बाजूला निपटून त्यानीं उरलेलें अन्न वाढून घेतलें त्याचें डोळे डबडबले होते त्या कठोर बोलाची आठवण होऊन पहिलाच घास त्याच्या घशात अडकला. त्याचा हुदका बाहेरल्या खोलींत ऐकूनही माधवरावानीं लघुकथा—तत्रावरील नव्या इग्रजी पुस्तकातून डोके वर काढलें नाहीं

दोन दिवसानतर माधवराव सहकुटुब पुण्यास आले.

मुबईस असताना 'वसत' मासिकच्या कचेरीबद्दल माधवरावाच्या कल्पना फार निराळ्या होत्या सपादकानीं दिलेल्या पत्त्याप्रमाणें मार्ग काढताना मात्र त्याना फार वेळ लागला. पुण्याच्या बोळ—गल्ल्या—चौक—

पेठाचे चक्रव्यूह भेदून अखेरीस माधवराव दिलेल्या घरनंबराशीं आले तों त्याचा विश्वासच बसेना डोळयावर.

एका मोडकळीस आलेल्या, तिमजली, चौसोपी पेशवाई थाटाच्या वाड्यावर 'वसत मासिक आणि छापखाना' या नावाची रग उडालेली एक लहानशी पाटी लोंबत होती. ते माडीवरील अंधाऱ्या 'सपादकीय कचेरींत' गेले एक मळकट कपडे घातलेला, दाढी वाढलेला, जाडजूड गृहस्थ समोरच्या देवदारी टेबलावर दोन्ही पाय पसरून, खुर्चीवर जवळ जवळ उताणा पडून, आढ्याशीं खेळणाऱ्या आपल्या बिडीच्या धुराकडे पहात होता माधवरावानीं गोंधळन टोपी काढली, केसात लपलेल्या टकलावरून हात फिरवीत, एक मिनिटभर उभ्याउभ्या चुळबुळ केली—पण त्याच अस्तित्व त्या गृहस्थाच्या ध्यानात लवकर येण्याचें चिन्ह दिसना शेवटीं ते खाकरत 'अहो' म्हणून घुटमळत म्हणाले आवाजाबरोबर दचकून, पाय मागें ओढून घेऊन त्या गृहस्थाने खुर्चीवर बैठक मारली जवळचा एक कागद घेऊन त्यावर भरभर काहीं लिहिण्याचें सोंग केलें

माधवरावानीं आत जाऊन सपादकाचें आलेले पत्र टेबलावर ठेवलें तें पहाताच मात्र त्या गृहस्थाचा चेहरा एकदम खुलला—आणि मग त्याच्या बोलण्याचा जो पूर सुरू झाला कीं त्यात गटगळ्या खाता खाता माधवरावाचो अगदीं दमछाकी झाली

'—ओ हो हो! माधवराव कोटिबुद्धे तुम्हीच का! वहाव्वा, वहाव्वा!! अलभ्य लाभ! अलभ्य लाभ!! तुमचे पत्र मिळाल्यापासून वाटच पहात होतों तुमची धन्य आहे तुमची

'वाङ्मयसेवेसाठीं बड्या नोकरीवर लाथ मारणारे ध्येयवादी साहित्यिक' असा "ग्रेट प्रायमर" टाइपात मथळा देऊन पुढील अकात तुमचा तिरगी फोटो छापणार आहोंत आम्ही

त्यानीं टेबलावरील घटेवर हात मारला, पण स्प्रिंग तुटल्याने ती मुकीच राहिली तेव्हा ते स्वतःच ओरडले— " अरे गणू!—गण्या! समोरून दोन कप चहा आणि लालदोरीवालीच बडल पाठवायला साग

पाहू तावडतोब ! अगदीं फर्मास कडक पाहिजेत दोन्ही. अन् खालीं प्रेसमधें फोरमनला साग, आपले मुंबईवाले नवे उपसपादक आले आहेत. सार त्याना विचारून करायच यापुढें

— माधवराव सकोचानें ' कशाला, कशाला, चहा नको आता' असे काहीसें पुटपुटत होते तिकडे लक्ष न देता सपादकानीं त्याचा हात धरून त्याना उठविलेच

"—चहा येतो आहे तेवढ्यात तुमच ऑफीस दाखवून टाकतों तुम्हाला चला—आजपासून तुम्ही नोकरीवर रूजू झालात तुम्ही आमचे, म्हणून आता आमच्या घद्यातल्या खुब्या दाखवून द्यायला हव्यातच. एकदा हा सारा व्यवहार तुमच्या ताब्यात दिला कीं मी सुटलों पुन्हा पुन्हा बोलण मला आवडत नाहीं एक घाव कीं दोन तुकडे असा माझा स्वभाव आहे— का असच ना ! द्या टाळी !—"

ह ! हे तुमच ऑफीस या १९०० सालापासूनच्या इंग्लिश, अमेरिकन, हिंदी, गुजराती मासिकाच्या बाधीव फायली तुमच मुख्य काम म्हणजे साऱ्याच्या चालू अकाकडे लक्ष ठेवून मजकूर नसेल तेव्हा मागच्या अकाचाही उपयोग मोकळया हाताने करायचा अहो लिखाणाला काय तोटा ? उगीच नाहीं—एक नव्हे पाच मासिक चालताहेत आमच्या छापखान्यात ! तुमच 'वसत' मुख्य अर्थात्, अन् स्त्रियासाठीं 'वनिता,' सिनेमा शोकिनासाठीं 'चद्रिका,' आपल एक नव खूळ निघालय् ना औद्योगिक धदे आणि कोंबडया, बकरी, मेंढ्या काय काय पाळायच म्हणून असू दे एक मासिक 'उपद्व्याप,' आणि पोराना हव म्हणून 'पोरखेळ' अन् हीं देखील साधीं नव्हेत बर का ! सचित्र ! दुरगी, तिरगी, हाफटोन, लाइन, लिथो, लिनो, ऑफ्सेट्, वुडकट् ब्लॉकसह !—द्या टाळी !"

बिचाऱ्या माधवरावानीं एकदोनदा मधेंच काहीं प्रश्न विचारण्याचा प्रयत्न केला पण हाताच्या हवेंतील ऐसपैस फटकाऱ्यानिशीं मालकानीं त्याचे सारे प्रश्न नाहींसे करून टाकले.

—' एकदा सागितल ना कीं, मला फार बोलण आवडत नाहीं !—

एकदा तुम्हाला इन्स्ट्रक्शन्स् दिल्या कीं माझं काम सपलं, पुढें तुमच्या कर्तबगारीवर—अरे चहा आलाय् वाटत ..'

दोन घोटात चहाचा कप फस्त करून 'लालदोरीवालीचा' एक जोरदार झुरका घेऊन पुन्हा सपादक म्हणाले—

"—हो! काय म्हणत होतों मी? यस्—आता धद्यातली मुख्य मख्खी म्हणजे तुम्ही जीभ अगदीं मिठास ठेवली पाहिजे. या खोलींत रोज लेखक लेखिकाचा थवा जमत असतो त्यातल्या त्यात पाहून, चहाचा कप देऊन, त्यात स्तुतीची भरपूर साखर पेरायची जो लेखक भेटेल तो त्याच्या क्षेत्रात सर्वश्रेष्ठ बर का! अन् त्यातच त्याच्या एखाद्या प्रतिस्पर्ध्याची जरा निंदा करता आली बर का तर फारच झकास—अन् हे पहा साहित्येकापेक्षा 'साहित्यिकी'कडे जास्त लक्ष ठेवायच बर का!—का द्या टाळी!"

त्याचा लेख दोन ओळींचा असला तरी वर तिरगी फोटो घालायचा तोही आहे तसा नव्हे—रिटच् करून, अगदीं 'मारु' दिसेल असा. कोणी खनपटीला बसून मोबदल्याचा प्रश्न काढलाच तर त्याला माझ्याकडे द्या पाठवून—तें काम नाहीं जुळणार तुम्हाला या मोबदलेवाल्याचा समाचार घेण्याच्या खास 'युक्त्या' मी गुलदस्तात ठेवल्या आहेत माझ्या जवळ. श्रीमत लेखकाचे लेख जाहिरातीच्या दरानें छापण्याची खास व्यवस्था फक्त आमच्या मासिकातच आहे बर का! तेवढ लिहिण्याचाही त्याना वेळा नसला तर तुम्हीच काहीतरी खरडून त्याच्या नावावर छापायच- त्याच्या स्पेशल दराच कोष्टक आहे माझ्याजवळ, तें घेऊन चला"

—वाङ्मयसेवा आणि वाङ्मय प्रकाशनाबद्दलची ही भयकर माहिती ऐकता ऐकता माधवरावाच्या चेहऱ्यावर घामाचे थेंब डबडबू लागले—भोंवतालची खोली गरगरा फिरते आहे असें वाटू लागले—तिकडे पाहून मालकानीं पुन्हा सरबत्ती सुरू केली—

'.. दचकू नका, घाबरू नका असे अहो वाङ्मय झाल म्हणून काय झाल! कोणतीही कला म्हटली म्हणजे तिच टेकनिक् आलच—आमच्या धद्याच तत्रच आहे हें, म्हणूनच आज जीव तरी धरून आहोंत

आम्ही! नाहींतर मराठी वाङ्मयाची आजची स्थिति माहीत आहेच तुम्हाला सगळयाना टीका, चर्चा, काथ्याकूट करायला हवा, दोष काढायला हवेत, पण दिडक्या खर्चून विकत घ्यायला नको कोणालाच—मग बोला, कशी चालवायची मासिक अन् कसा मोबदला द्यायचा लेखकाना! बरय् आता पुढच्या अकासाठीं या लेखाच्या फायली पहा मला प्रेसकडे बघायचय्—तुमच्या फोटोचा ब्लॉक करायला सागतों अन् तो छापायचा रगीत चौकटींत पुढच्याच अकात—का आहे का नाहीं—द्या टाळी!"

मालक हशानें खदखदत खालीं प्रेसमधे निघून गेले मनाप्रमाणेंच कुरकुरणाऱ्या खुर्चीवर बसून, देवदारी टेबलावरच्या फायलीकडे गोंधळून पहात कितीतरी वेळ माधवराव तसेच बसले होते

शेवटीं एक निश्वास टाकून त्यानीं दौतींत टाक बुडविला आणि सपादकीय कार्याला सुरवात केली

❦ ❦ ❦

दिवसामागून दिवस जात होते. दुरून साजऱ्या गोजऱ्या दिसणाऱ्या या वाङ्मय व्यवसायाच्या डोंगराच्या पोटात काय काय काटेकुटे भरले आहेत याची खरी कल्पना आता माधवरावाना येऊ लागली. जमेच्या बाजूला मात्र दोन फायदे झाले खरे

पहिला म्हणजे वसत मासिकात त्याची कादबरी क्रमश. प्रसिद्ध होऊ लागली—

आणि दुसरा म्हणजे—

कु बुद्धिमती धैर्यधर या लेखिकेचा 'दाट' परिचय!

लेखणीपेक्षा डोळ्याची तिरदाजी करण्यातच या लेखिकेचें कौशल्य विशेष होतें माधवरावासारख्या साध्या भोळ्या सावजाची तर तिनें पहिल्या बाणातच शिकार केली

मुद्दाम पुढें ओढलेले, भुवयावर लोंबणारे केसाचे पुजके, बारीक मुग्याच्या रागेप्रमाणे दिसणाऱ्या, कोरलेल्या भुवया, पोष्टाच्या पेटीप्रमाणें लालभडक रगलेले ओंठ...तग इग्रजी बॉडीनें आवळल्यानें उचावलेलें वक्षस्थळ, गोल गुडाळलेलें, वीत वीत ठशाचे भडक रगीत पातळ—असें तिचें ध्यान होतें.

माधरावाची ओळख होऊन चार दिवस झाले नाहींत तोंच एके दिवशीं दुपारीं मुरडत, कर्कश ‘गळी’ आवाजात कृत्रिमपणे हसत येऊन तिनें त्याच्या खुर्चीच्या हातावरच लडिवाळपणें बैठक मारली “अशी फाइन आयडिया सुचली आहे–कुण्णी कुण्णी लिहिल नाहीं तिच्यावर. गोष्टीला सुरवात सुद्धा केली, पण मेली अर्ध्यावरच अडली अस्सा राग आला मेलीचा!—मग म्हटल आपल्या माधवरावाखेरीज दुसऱ्या कुण्णाला सागायच नाहीं हें गुपित

पण इथ नको गडे! सध्याकाळीं माझ्या खोलीवरच या म्हणजे चटकन् लिहून टाकू नाहीं? . हसायच नाहीं—नाहींतर रागावेन मी! हु, सीरीयसली काय म्हणालात? जा, तुमची थट्टाच मेली—काम काम काय, सदाचींच आहेत तुम्हाला—पण मी नाहीं ऐकायची आज–आलच पाहिजे घरीं, अन् लिहून दिलीच पाहिजे गोष्ट आम्हाला–!”

गाल फुगवून, तिरप्या नजरेनें पहात तिनें रगलेल्या नखानीं खटका दाबून छोटी बॅग उघडली आधीं आतल्या आरशात पाहून जरा साफ-सुफी केली आणि नतर पुन्हा मानेची वाकडी कसरत करीत, मुरडत, वेड्या वाकड्या लिखाणानें चिताड केलेले दोन कागदाचे कपटे माधवरावापुढे ठेवले ‘चीरीयो ऽऽ’ म्हणून हात उडवून धावत मुरडत ती जिना उत-रून गेली सुद्धा

सध्याकाळपर्यंत माधवरावानीं गोष्टीचा नीट प्लॉट जुळवून, प्रसग, व्यक्ति, याचा आराखडा काढून ठेवला—कचेरी सपल्यावर धडधडत्या हृदयानें ते बुद्धिमतीबाईच्या खोलीवर गेले

उची फर्निचरने सजविलेल्या खोलीभर उदबत्त्याचा घमघमाट सुटला होता. भितीवरून अर्धनग्न स्त्री–पुरुषाच्या ठसठशीत देहसौष्ठवाचीं छायाचित्रें टागलेलीं होतीं. भरपूर जायफळ घातलेली मसालेदार कॉफी घेऊन माधवराव लघुकथा सागू लागले. एकाच टेबलाशीं, खुर्चीला खुर्ची भिडवून बसलेल्या बुद्धिमतीबाईच्या केशसभाराचा मादक सुगध त्याना बेचैन करीत होता सागितलेला मजकूर उतरीत, कागदावरून धावणाऱ्या त्याच्या सडपातळ बोटावर, गोल, गौर, वलयाकित मनग-

टावर त्याची दृष्टि खिळली होती उतरत्या चेहऱ्यानें आणि चोरट्या पावलानीं माधवराव रात्रीं घरीं परतले त्याना रमाबाईंच्या डोळ्याना डोळा भिडविता आला नाहीं आज

आणि हळू हळू बुद्धिमतीबाईंचे नाव एक प्रतिभाशाली लेखिका म्हणून सर्वत्र प्रसिद्ध होऊ लागलें त्याच्या कथा, निबधाची सर्वत्र प्रशसा होऊ लागली—माधवरावाच्या नावावर मात्र अलीकडे एकही कथा जमा नव्हती हा एक चमत्कारिक योगायोगच समजायचा.

* * *

या साऱ्या उन्मादक वातावरणात व्यावहारिक गोष्टींकडे मात्र माधवरावाचे पूर्ण दुर्लक्षच होत होते पहिल्या महिन्याचा पगार आपल्या कडे येइल म्हणून त्यानीं दहा तारखेपर्यंत वाट पाहिली–आणि मग हळूच सपादक—मालकाकडे गोष्ट काढली तोंडाचा आ वासून ते सपादक क्षणभरात उसळलेच—‘ आ ! म्हणता तरी काय ! पगार मिळाला नाहीं तुमचा ! अशक्य गोष्ट, अशक्य गोष्ट ! अहो महिन्याच्या शेवटच्या तार खेला आम्ही चेकने एकदम रक्कम काढतों अन् पाच तारखेच्या आत सारीं बिलें अन् पगार खलास ! ( त्यानीं हवेत ऐसपैस हाताचा पवित्रा फिरविला ) मग महिनाभर पैही खर्च पडायची नाहीं — हो शिस्तच आहे आमची–असल—असेल कॅशियरची चूकही असेल–पण तुमच तरी काम होत ना बोलायच ? आता कस करा ऽऽ यच ऽ ?—दिला असता हो ! या क्षणाला मी स्वतः उचलून दिला असता पगार पऽऽण, सस्थेचा सक्त नियम आहे म्हणतों ना ! मऽग ? काय करायच आता ?—अरे हो ! द्या टाळी ! असच करा कीं, पुढच्या महिन्याला दोन्ही महिन्याचा पगार एकदमच घेऊन जा म्हणजे झाल ”

मालकाच्या शब्दाच्या लोंढ्यातून कसेबसे पैलतीरी येऊन माधवरावानीं मुकाट्यानें पोष्टल् सेव्हिंग् बॅकेतून पन्नास रुपये काढून आणले आणि बिले भागविलीं

दुसऱ्या महिन्यात दहा तारखेपर्यंत मालकाचा कचेरींत पत्ताच नव्हता. प्रेससाठीं कागद खरेदी करायला मुबईला गेले होते ते. त्यांच्या

सहीशिवाय पैही देण्याचें कॅशियरनें साफ नाकारलें. मुंबईच्या खर्चिक रहाणींतून शिल्लक राहिलेली रक्कम आतापर्यंतचा संसार सजविण्यात गेली. पुन्हा पन्नासाची रक्कम उचलल्यावर खात्यावर शून्याची बाकी उरली.

हळू हळू छापखान्यातील 'वनिता' आणि 'चंद्रिका' मासिकाच्या संपादनाची कामेंही माधवरावावर पडू लागली 'वनिता' मासिकाच्या संपादिकेनें बाळतपणासाठीं चार महिन्याची रजा घेतली होती, आणि 'चंद्रिका' मासिकाचा संपादक, तोंड फाटेपर्यंत अनेक महिने एका नटीची आणि दिग्दर्शकाची स्तुति मासिकभर करकरून आता हळूच त्याच्या वशिल्यानें आपली एक पटकथा खपविण्यासाठीं मुंबईच्या स्टुडिओशीं धरणें धरून बसला होता

अनेकदा "झक् मारली अन् या उपद्व्यापात पडलों" असें माधवरावाना वाटे हें काम सोडून दुसरा उद्योग पहाण्याचीही कल्पना येई, पण अशा वेळीं त्याची खूपशी स्तुति करून, कथासंग्रह, कादंबरी, निबंधसंग्रह या साऱ्या लिखाणाचे प्रकाशन करण्याची लालूच लावून, पुढें भरपूर वेतन देण्याचे मधाचे बोट मालक दाखवीत उरले सुरलें प्रलोभन बुद्धिमतीबाईच्या मादक प्रणयाचें

बदललेलें हवापाणी, तळमजल्यावरील दमट जागा, अंधाऱ्या कचेरींत, विजेच्या दिव्याखालीं रोज नऊ तास काम मोकळी हवा नाहीं—व्यायाम नाहीं—विश्रांति नाहीं—मनस्वास्थ नाहीं साहित्याच्या चक्कीला जुपलेल्या माधवरावाची अशी दमछाकी चालली होती चहा—विडी सिगारेटच्या कृत्रिम उत्साहावर आणि मदिरेसारख्या उन्मादक बुद्धिमतीबाईच्या प्रणयाच्या कैफावर ते बळेंच सारीं कामे चालू ठेवीत दिव्यातले तेल संपल्यावर ज्योत कायम ठेवण्यासाठीं आपण ती कोरडी वातच वर वर सारावी, ती थोडा वेळ जळत राहून शेवटीं लाल होत मालवत जावी, असा माधवरावाच्या जीवनाचा खेळ चालला होता

एके दिवशीं सकाळीं मात्र त्याना अंथरुणावरून उठवेनाच. त्यानीं छापखान्यात काकुळतीनें निरोप पाठविला व औषधपाण्यासाठीं निदान दहावीस रुपये तरी तावडतोब पाठवून द्यावे अशी विनतीची चिठी पाठविली. त्यावर मालकाचे मासलेवाइक उत्तर आलें तें असें:—

' आपण तापानें आजारी आहात हें वाचून फार वाईट वाटलें. येथील चार दैनिकात ' प्रसिद्ध साहित्यिकाचा आजार ' हा मथळा घालून ही बातमी पाठविली आहे सुदैव हे कीं ' वसत ' मासिकाच्या मागच्या अकात आपणच " तापाचा परिताप " म्हणून एक सुदर लेख लिहिला होता त्यातील उपचाराप्रमाणें वागून आपण लौकरच रोग-मुक्त व्हाल अशी मला खात्री आहे आपल्याप्रमाणें माझेही मत आहे कीं बहुतेक रोग अपचनामुळेच होतात तरी आपण आठ दिवस कडकडीत लघन करावे डॉक्टर वैद्याच्या खिशात उगीच पैसा लोटू नये आठ दिवस पाण्यावर राहून काय अनुभव येतो तो कळवावा— पुढील अकात आपल्या नव्या फोटोसह तो प्रसिद्ध करू अर्थात् या उपायामुळे औष-धोपचारासाठीं खर्च करण्याची जरुरीच उरणार नाहीं, म्हणून रक्कम पाठ-विली नाहीं पडल्या पडल्या रोग्याचा वेळ जाणे कठीण म्हणून ' वसत ' ' वनिता ' आणि ' चद्रिका ' मासिकाच्या पुढील अकाच्या एकूण दीडशे पृष्ठाची पहिलीं गॅली प्रुफे पाठविलीं आहेत आणि आपली बिन पगारी रजाही मजूर केली आहे— त्याबद्दल बिलकुल काळजी करू नये— आमच्या नोकरवर्गाकडे आम्ही नेहमीच सहानुभूतीनें पहात असतों. आपण खुशाल चार आठ दिवस भरपूर विश्राति घेऊन दुप्पट जोमानें साहित्यसेवेला लागाल अशी आशा आहे

आपला—× × ×

सपादक, सचालक, उत्पादक आणि मालक

' वसत ' मासिक

हें पत्र वाचून माधवरावाना रागानें झीटच आली. आईनें दिलेल्या बटव्यातील मात्रा उगाळून दिल्यावर जरा बरें वाटून त्याना झोंप लागल्या-वर रमाबाईनीं मुकाट्यानें तुळशीबागेंत जाऊन एका सराफी दुकानात आपले बिलवर गहाण टाकले आणि डॉक्टरला बरोबर आणून औषधपा-ण्याची सोय केली

त्या रात्रीं दोन वाजण्याचा सुमार असेल. माधवरावाना बारा वाजता

औषधाचा डोस देऊन, त्याच्या उशाशीं बसल्या बसल्या, गुडघ्यापर्यंत मान लववून रमाबाई पेंगत होत्या त्या एकाएकीं जाग्या झाल्या

मागे कधींकाळीं ऐकलेलें एक पद माधवराव वेडेवाकडे सूर काढून बरळत म्हणू लागले होते,—

—हे फळ काय मम तपाला !

तापानें त्याचे डोळे लालभडक झाले होते—मध्येंच भेसूरपणें ते बरळू लागले.

"—साहित्यसेवा–वाङ्मययज्ञ हा हा हा !–गळे कापा या नावानीं–उपाशी मारा आणखी सारी झब्बूगिरी–फुकटेबाजी—भरल्या पोटाचे उद्योग सारे कितीकाचे खून पडले असतील माझ्यासारखे थांबा आता समाचार घेतों एकेकाचा "

म्हणून ते धडपडत उठण्याचा यत्न करू लागले

'अस काय करायच ते' ! रमाबाई घाबरून म्हणाल्या—'स्वस्थ पडायच बरका–बरळायच नाहीं–हलायच नाहीं'—

कोलन वॉटरमधें रुमाल भिजवून त्यानीं माधवरावाच्या कपाळावर ठेवला पाच दहा मिनिटानीं ते जरा शुद्धीवर आले क्षीण आवाजात त्यानीं विचारले—'बुद्धिमतीबाई आल्या होत्या का ? माझा निरोप कळविला नसशीलच तू त्याना—'

"—कळविल सार–पण त्या नाहीं आल्या गड्याबरोबर त्यानीं निरोपन् चिठी मात्र पाठविली '

"—काय —काय म्हणाली ती ?" माधवरावानीं डोळे उघडून उत्सुकतेने विचारले

"—त्यानीं कळविल कीं तुम्हाला जरा बर वाटल्याबरोबर त्यानीं पाव लिहिलेली गोष्ट नीट सुधारून पुरी करून परत धाडावी कुठल्याशा चढाओढीसाठीं पाठवायची आहे त्याना "

"--पैशाच काय झाल ? निदान उसनवार तरी ? "

"—सध्या सवड नाहीं—कथासग्रह काढताहेत त्याच्या छपाईला हवेत म्हणून कळवल त्यानीं."

—मग मात्र माधवरावानीं डोळे फाडून, कावरे बावरे होऊन विचारलें,

"—मग–मग–हा खर्च कुठला ? डॉक्टर, औषध, फळ ? घरात ताम्याचा पैसा नव्हता ."

रमाबाईनीं पदरामागे हात लपविला आवढा गिळून त्या म्हणाल्या,—"केली कशी तरी व्यवस्था सान्यानीं सोडल तरी देव पाठीराखा आहे आपला–स्वस्थ पडायच आता—कपाळ चेपू का ?"

माधवरावाचे अग निखाऱ्यासारखें धगधगत होतें त्याच्या डोळ्यातून, तोंडातून वाफा निघत होत्या नुसत्या

—'काही नको करूस नुसता हात ठेव बर कपाळावर किती गार—किती बर वाटत !'

माधवरावानीं आपला हात त्या हातावर ठेवला मनगटावरची एकच काचेची बागडी बोटाला लागून त्यानीं दचकून सताड डोळे उघडले त्याच्या डोळ्याच्या कोंपऱ्यातून अश्रु ओघळू लागले त्या कृश हातावर हात ठवून कितातरी वेळ ते असेच पडल होते शेवटीं एक हुदका देऊन ते कष्टाने धीर करीत म्हणाले—"काय कलस हे ?–बागड्या विकल्यास–माझ्यासाठीं ? रमा ! कशाला कष्ट करतेस इतके माझ्यासाठीं ? इतकीं वष तिरस्काराा वागविल मी तुला–लिहिण्याच्या व्यसनापायीं तुला सुखाचा क्षण दाखविला नाहीं–रुपाबद्दल तुला हिणविल–तुझ्या मरणाचीसुद्धा इच्छा केली–अन् अशा नादानासाठीं तुझीं सौभाग्यलेणीं मोडलींस तू !– रमा ! कुठ फेडू माझीं पाप मी ?"

—रमाबाईनीं त्याच्या तोंडावर हात ठेवला

—"पुरे–पुरे–किती त्रास करून घ्यायचा जीवाला ? हें औषध घ्यायच अन् अगदीं मुकाट्यान झोपी जायच आता उद्या खात्रीन बर वाटेल" लहान मुलाप्रमाणें अगदीं आज्ञाधारकपण माधवरावानीं औषधाचा कप तोंडाला लावला

घामानें भिजलेली त्याच्या डोक्याखालची उशी उलटून रमाबाईनीं सरकावून ठेवली चादरीचे सळ मोडून नीट केले—आणि

अंगावर ब्लँकेट ओढून घेतलें माधवरावानीं त्याच्या कपाळावरचा तो कृश, काळसर हात तसाच धरून ठेवला—तुफान दरियात गटगळ्या खाणाऱ्या खलाशानें एखादी लाकडी फळी जीवाच्या आधारासाठीं निर्वाणीनें घट्ट धरून ठेवावी—तशा निर्वाणीच्या आशेनें माधवरावानीं तो प्रेमळ, धीर देणारा हात धरून ठेवला होता

पहाटेस पूर्वेला तांबडें फुटलें तरी झोपेंतही माधवरावांच्या हातांत तो हात तसाच होता. त्याची झोपमोड होऊ नये म्हणून अगदीं अव-घडून रमाबाईही रात्रभर तशाच बसून राहिल्या होत्या

डॉक्टरांच्या औषधानें असो, रमाबाईंच्या प्रेमळ शुश्रुषेमुळें असो, माधवराव आठ पधरा दिवसानीं हिंडू फिरू लागले मात्र यापुढें प्रकृति नीट ठेवायची असली तर राहती जागा, हवा आणि व्यवसाय यांत बदल केलाच पाहिजे असें डॉक्टरांनी निक्षून सांगितलें या आठ दिवसांत माधवरावांच्या देहाप्रमाणेच मनांतही बराच फरक पडला होता

बरें वाटल्यावर माधवराव ' वसंत ' कचेरींत रुजू झाले, पण पगाराची गोष्ट काढताच टाळाटाळ करून त्यांच्या गैरहजरीनें मासिकाचें किती नुकसान झालें याचें भडक वर्णन करण्यातच मालकानीं अर्धा तास वक्तृत्व गाजविलें.

सात्विक प्रकृतीच्या माधवरावांचेंही या प्रकारानें डोकें भडकलें. रागाच्या तिरिमिरींत राजीनामा खरडून दिला त्यानीं ते कचेरींतून बाहेर पडत असतां मालक चिडून त्यांना दम देत होतेच— " माधवराव कोटिबुद्धे ! नोटिशीशिवाय नोकरी सोडताय् लक्ष्यांत ठेवा एकदा मी चिडलों म्हणजे माझ्यासारखा वाईट कोणी नाहीं बर का ! पुढच्याच अंकापासून " जाधवराव शून्यबुद्धे याची अर्डी पिर्ली " या नावाची एक लेख-माला सुरू करून भंबेरी उडवितों तुमची याद राखून ठेवा "

❧ ❧ ❧

माधवरावांना दशदिशा शून्य झाल्या होत्या. ते कपाळाला हात देऊन बसले असतां मागून हळूच एक आवाज आला.

"—माझं ऐकणं होईल का ?— असेल तर सांगतें "

"—हंऽऽ! बोल— खुशाल बोल माझ्या अकलेचे हे असे धिंडवडे निघाले, तेव्हा मला नाहीं म्हणायला तोंड कुठें आहे! काय म्हणतेस? माहेरीं नेतेस मला? तेवढ तरी समाधान लाभू देत मामाना."

—मी म्हणतें आपण एक पत्र टाकाव मुबईला आपल्या जुन्या कचेरींत. आपणच सागायच कीं मालकाची भारी मर्जी असायची अन् भारी वाईट वाटल त्याना इकडे निरोप द्यायला

"—अग कसल काय नी कसल काय! आपली बोलायची रीत आहे झाल बाकी एवढ खर कीं साऱ्या नोकराशीं गोड बोलून काम करून घेण्याची कला या गुजराती मालकात आहे खास पण आता काय त्याच? त्याचा आस्थेचा उपदेश लाथाडून मी ताठ्यानें इकडे निघून आलों–अन् आता खालीं मान घालून, त्याच्यापुढेंच पदर पसरायला सागतेस मला?"

"— पण मी म्हणतें एकदा आपला रस्ता चुकला हें कळल्यावर मग हट्टान त्याच रस्त्यानें पुढ जाण्यात काय फायदा? त्यातन काय? फार तर 'नाहीं' म्हणेल एवढच ना? इतक सोसल, त्याला एका नकाराचा भार नाहीं इकडून नेहमीं म्हणायच होत तशीच मी आपली अशिक्षित भोळी भावडी आहे–पण माझा आपला दृढ विश्वास आहे कीं साऱ्यानीं सोडल तरी देव नाहीं आपली उपेक्षा करणार मला दुसर तिसरं काहीं कळत नाहीं हे पाय मला परत लाभले, मागची आढी दूर करून आपण मायेन बोलायला लागलात— यानच धन्य झाले मी आता देवा–जवळ काही दुसर मागण नाहीं—अशीच भरल्या कपाळीं, सोन होऊन जाव, अन् शेवटीं इकडचेच हात अगाला लागावेत एवढच मागण आहे रामापाशीं." गळा दाटून येऊन रमाबाईनीं पदरानें डोळे पुसले–माधव-राव एकाएकीं खिडकीकडे पाठमोरे वळले, त्याची मान खालीं लवली.

त्या दिवशीं नाखुषीनेंच त्यानीं मुबईला एक पत्र टाकलें सहज चालता चालता एखाद्या झाडावर धोंडा फेंकावा आणि पुढें चालू लागावें अशा रीतीनें त्यानीं हें पत्र टाकलें होते.

❦ ❦ ❦

चार दिवस झाले असतील त्याला. घरभाड्याबद्दल चौथ्यांदा बजावून, मालक गुरगुरत नुकताच निघून गेला होता. तें दु:ख विसरण्यासाठीं माधवराव कागद पुढें ओढून काहींतरी लिहीत बसले होते.

अंग धुवून आत आलेल्या रमाबाईनीं कोनाड्यातल्या रामाच्या तसबिरीला नमस्कार केला—चार फुलं वाहिलीं आणि उरलेलीं दोन कुंदाची फुलं आपल्या अंबाड्यात खोवलीं.

बाहेरच्या खिडकीशीं आवाज आला—

पोस्टमन!

आत पत्र पडल्याचा टप्‌कन् आवाज आला—'पत्र आलय् कुणाचं पहायचं जरा'—रमाबाईनीं सूचना दिली पण लेखनसमाधींत मग्न झालेल्या माधवरावाचें डोकें वर उचललें नाहीं.

रमाबाईनींच तें पत्र उचलून त्याच्यापुढें ठेवलें

पत्रावरील 'रसिकलाल डाह्याभाई' हीं छापील अक्षरें वाचून मात्र ते दचकले थरथरत्या हाताने त्यानीं तें पत्र फोडलें एक जाड, लहान कागदाची घडी पत्रातून खालीं पडली पत्र मात्र चार ओळीचेंच होतें

"फर्ममधील त्याची हेडक्लार्कची जागा सध्या भरली असली तरी त्या खालची शभराची जागा त्याचे जुने संबंध जाणून त्याना देण्यात येत आहे. रुजू झाल्यापासूनचा महिन्याचा ॲडव्हान्स पगार म्हणून शभर रुपये त्याच्या नावें लिहिले असून त्या रकमेचा चेक् त्याची अडचण जाणून पाठविला आहे त्याची पावती पाठवावी "

'वसंत' मासिकाच्या संपादकाच्या अघळपघळ वक्तृत्वापेक्षा या व्यवहारी पण माणुसकीच्या द्योतक चार ओळी माधवरावाना फार श्रेयस्कर वाटल्या

त्याच दिवशीं त्यानीं रमाबाईच्या बांगड्या सोडवून आणल्या. घरभाडें आणि उरलेलीं बिलें चुकती करून ते मुंबईला निघाले

'वसंत' मासिकाच्या कचेरीवरून त्याचा टांगा जात असता माधवरावाची नजर सहज आत गेली. मालकासमोरच्या खुर्चीवर एक चष्मेवाला, पुढें दात असलेला तरुण बसला असून, मालक त्याच्याकडे

हातवारे करून काहींतरी भरभर बोलत होते  टेबलावर तीन कपबश्या असून, त्या चष्मेवाल्याच्या खुर्चीला खेटून उभे राहून, सुप्रसिद्ध लेखिका बुद्धिमतीबाई घैर्यघर या हसहसून, मानावेळून, किटलींतून चहाचे पेले भरीत होत्या.

  

.. पूना एक्स्प्रेस खडाळ्याच्या घाटातून वाकड्या वळणा वळणाने धावत होती.  एरव्हीं काळे कभिन्न दिसणारे डोंगरही आता हिरवेगार झाले होते  रेल्वेलाइनजवळच्या काळया खडकावरही बारीक शेवाळाची हिरवी मखमल अथरली होती  खिडकींतून येणाऱ्या थड गार वाऱ्यानें माघवरावाचे केंसही त्याच्या मधेंच पडलेल्या टकलाभोंवती इकडे तिकडे झुलत होते

पण भोंवतालच्या सुदर देखाव्याकडे पहातानाही ते बेचैन होऊन, शून्य नजरेनें कुठेंतरी लाबवर पहात होते

समोरच्या बाकावर बसलेल्या रमाबाईनीं वाऱ्यावर भुरभुरणारे आपले केंस आवरले—उडणारा पदर ब्लाउजच्या गळयाशीं खोंवून घट्ट बसविला.

त्याची नजर माघवरावाच्या दूरवरच्या शून्यदृष्टीकडे गेली  त्यानीं हळूच प्रश्न केला—‘ इतक निरखून काय पहायच तें ?’

—‘ काहीं नाहीं ’— “ दूरचे डोंगर ” माघवराव उत्तरले, आणि एक उसासा टाकून त्यानीं आपल्या बाजूची खिडकी बद करून टाकली !



## ५ : विजेचा पाळणा

Not- Bad.

सू ऽ ऽ—

चढत्या सुराच्या सप्तकात विजेचा पाळणा ' माधव-कॅसल ' च्या सहाव्या मजल्यावर सरसर चढत होता खर्रकन् घडीचे लोखंडी दार बाजूला आपटलें, आणि लिफ्टमन्च्या सलामाकडे नजरही न टाकता माधवजीशेट खाडखाड पपशू वाजवीत आपल्या ऑफीसमध्यें शिरले.

ते चालताना होणारा ठराविक तालबद्ध पदाघात, त्यातच त्याच्या हातातील काठीचा टक् टक आवाज हे त्याच्या नोकरवर्गाला पूर्ण परिचित झाले होते ते येण्यापूर्वीची कारकुनाची हसण्याची लकेर अर्ध्यांतच थांबली आणि साऱ्याच्या माना एकदम खालीं लवल्या ताशाच्या कडकडाटाप्रमाणें टाइपरायटरच्या किल्लया एकदम गर्दीनें वाजू लागल्या. एकाने टेलिफोनचा कान पकडून ' हलाव् हलाव् ' करून शेअर बझारची हालचाल कागदावर टिपण्यास सुरवात केली

साऱ्या ऑफीसवर एक करडी नजर टाकून आपल्या स्वतंत्र खोलींत जाताना माधवजीशेटनीं काचेच्या अर्ध्या दाराला एवढ्या जोरानें धक्का दिला कीं त्यानें चार वेळा आत बाहेर हेलकावे खाल्ले.

आत जाऊन त्यानीं कोनाड्यातील लक्ष्मीच्या चांदीच्या फोटोला नमस्कार केला कोपऱ्यातल्या खुजात भरलेलें, हायकोर्टच्या विहिरीचें खास पाणी भांडें भरून टेबलावर ठेवलें डोक्यावरील गुजराती पगडी काढून, तुरळक केस—टकलावरील घाम पुशीत, टेबलावरच्या 'मेमोज्' वर नजर टाकली वाचता वाचता आपल्या झुपकेदार पांढऱ्या मिशावरून पुन्हा पुन्हा बोटें फिरविलीं कोणत्याही कारणानें अस्वस्थ झाले म्हणजे आपल्या मिशातून बोटें चाळविण्याची त्याना सवय होती टेबलावरील कागद चाळता चाळता त्याची मुद्रा अधिकाधिक उग्र होऊ लागली. त्यानीं कर्रकन् टेबलावरची घंटा दाबली, आणि मिनिटभर तिच्यावरचें बोट उचललें नाहीं

'यस् सर'! म्हणून ठराविक उत्तराचा आवाज देऊन पालवणकर हेडक्लार्क ताडकन् बाहेरच्या टेबलाजवळून उठला.

हातातली कॉपिंग् पेन्सिल तशीच कानावर ठेवून तो तातडीनें आत गेला. काचेचें अर्धे दार बंद झाल्यावर साऱ्या नोकरानीं भुवया उंचावून, माना हलवून, शेटजींच्या रागाची एकमेकाना जाणीव करून दिली.

पालवणकर आत आल्याबरोबर टेबलावर मूठ आपटून आपल्या अर्धमराठी भाषेत माधवजीशेट रागानें म्हणाले—

"ये समदा चालला हाय् काय् फर्ममदी ते मी विचारायला मागते. साला बिझिनेस् समदा स्लॅक्, अने तुमी नोकर लोक बस् 'पैसा लाव' करते. ते काय् आमचे घरमदी रुपियाची खाण लागली समजते?— नवा टाइपराइटर मागते—क्लार्क, लिफ्टमन्चा प्रमोशनचा अरज फॉरवर्ड करते—ते एक गधेडा हाय, तुमीबी झाला का त्याचे सारखा? ये साला बिल्डिंगइन्स्पेक्टर बी लिफ्टच्या रिपेरीची फाइनल नोटीस देते— फाइनल नोटीस बोलते साला—तेचा बापचा लिफ्ट हाय्? बस् ते प्रमोशनवाला क्लार्क नी लिफ्टमन्ला नोटीस देवा, नी कमी पगारचा नवा लोक नीमून घेवा . . "

"—पण साहेब, पंधरा वर्षे नोकरी करताहेत ते आपल्या फर्ममध्यें."

शेटजींचीं बोटें जोरजोरानें मिशातून फिरू लागली. ते तार स्वरात

ओरडले–" पन्नास वर्षों नोकरी करते! काय फोकट तर नाय् करते नोकरी! ये आफीस् हाय्, समजला–बिझिनेस् हाय्–अन्नछत्र नाय्–तुमचेसारखा 'तात्या' लोकला नाय् समजेल ये बाबत–अरे पालवणकर! पैसा पाहिजे पैसा — पैसा होयेल तर असा छपन्न माणसा हात जोडून मजुरी करायला येल आमच्याकडे

जवादे ये समदी बाता अपकंट्रीचा टेलिग्राम आला हाय् दोन लाखच्या सिक्युरिटीचा सेल करा सब्–ब्रोकरला बोलवा–आजचा भाव काय हाय्–आज शामपर्यंत बदोबस्त झाला पाहिजे "

"—पण साहेब, सिक्युरिटीज् ऑफीसमधे नाहीत, बंगल्यावर तिजोरींत ठेवल्या आहेत आपल्या—रतनबाईना चिठी दिली तर घेऊन येतों कीं—"

माधवजीशेटनीं खिशातल्या किल्ल्या चापसल्या—" रतन काय देते ?—' तिजोरीची चावी मी कोणाजवळबी नाय् देते–बगलवर जाऊन काढून ठेवते मी–तासाभराने क्लार्कला भेजून द्या सांताक्रूजला तेला बरोबर घेऊन, शेअरबझारमदी जायेल आम्ही "

त्यानीं टेबलावरचे मेमोज टरकावून खालीं टोपलींत टाकले. " आता पुन्हा ये प्रमोशनची भानगड करून सतावू नको आम्हाला–जाव्! "

पालवणकर मुकाट्यानें बाहेर गेला दाराजवळच, एका उंच स्टुलावर बसून, मोठ्या थोरल्या लेजर—बुकमध्ये तांबडे काळे आकडे मांडणाऱ्या एका म्हाताऱ्या, किडकिडीत कारकुनानें त्याच्याकडे आशेनें नजर टाकली—आणि निराशेनें खालीं मान वळविली त्याच्या पाठोपाठ शेटजी लिफ्टकडे निघाले त्याच्या काठीचा टक् टक् आवाज कानाआड होताच ऑफीसमधल्या साऱ्या कारकुनाना एक मोठे दडपण दूर झाल्यासारखे वाटलें.

लिफ्टमधून खालीं जाताना नोकरानें लिफ्टची दुरुस्ती, नवे दोर टाकणें, वगैरेबद्दल विनति केली–पण शेटजी रागाने त्याच्यावरच उसळले–

" बस्, बस्, वधारे डापण (शहाणपणा) करू नको—शामपर्यंत समदा लिफ्ट बराबर दुरुस्त करून झाला पाहिजे–नाहींतर दुसरा लिफ्ट-

मन् नेमेल आम्ही हाय कुठें नोकरी आजकाल! पैसा देते—पैसा, काकरा (खडे) नाय्–एवढा पगारमदी दोन लिफ्टमन् मिळते आज आम्हाला–"

माधवजीशेट खालीं येऊन, लिफ्टमन्नें बोलविलेल्या टॅक्सींतील नरम गाद्यावर रेलले

उच्च, उच्च, पण कळकट अशा इमारती, ट्राम, बस्, व्हिक्टोरिया याची गर्दी—या साऱ्यातून बाहेर पडून त्याची टॅक्सी बी बी सी आयच्या लोकलला समांतर अशा रस्त्यानें धावत होती डाव्या हाताला मधून मधून दूरवर उन्हात सळसळणाऱ्या समुद्राचें दर्शन होई—तिकडून येणाऱ्या किंचित् खारट वाऱ्याने त्याना जरा थडावा वाटे. लोकलगाडी-बरोबर धावणाऱ्या त्याच्या टॅक्सीकडे पाहून गाडींतील लहान मुलें हसून टाळया पिटीत, हातरुमाल उडवून ओरडत परंतु भोंवतालच्या प्रसन्न सृष्टीकडे लक्ष देण्याची किंवा मौजेत रमण्याची शेटजींची मनस्थिति नव्हती. शेअर्स, सिक्युरिटीज् याच्या भावाचे चढउतार, हुंड्या, वायदे, डिव्हिडड, तेजीमदी या साऱ्याचीं चक्रें त्याच्या डोक्यात फिरत होतीं

सांताक्रूज्चे बगले लागल्यावर ते आपल्या तंद्रींतून जागे झाले. ते बगल्याच्या आवारात शिरताना पाहून, हातातली चंची खालीं टाकून बागेंतला माळी जोरजोरानें खराट्यानें झाडू लागला. शेटजींच्या अवेळीं अचानक येण्याचें त्याला आश्चर्य वाटले आणि आपली आरामशीर विश्रांति मोडल्याबद्दल रागही आला

स्वयपाक आणि साऱ्याचीं जेवणे उरकून 'भट' (आचारी) केव्हाच निघून गेला होता. मागील दारीं गड्याच्या भांडीं घासण्याचा, कपडे धुण्याचा जोरजोराचा आवाज येत होता मधूनच गप्पा मारणाऱ्या एखाद्या 'बालू'चा नाकातला कोंकणी आवाज येई—"इयेटाणीला मी म्हनताव् "

झपूझप् पावलें टाकीत शेटजी बगल्यात शिरले आणि आपल्या शेजघरातील तिजोरीकडे निघाले. इतक्यात त्याचे पाय एकदम बधिर झाल्याप्रमाणें जमिनीला खिळले. शेजारींच असलेल्या रतनच्या खोलींतून तिचा हसण्याचा आवाज येत होता, सवयीमुळें शेटजींचे आतापर्यंत तिकडे

दुर्लक्षच होतें—पण त्याच क्षणीं तिच्या नाजुक, गळी, हसण्याला एका पुरुषी हसण्याबोलण्याची साथ मिळाली आणि माधवजी एकदम चपापले.

कावरेबावरेपणानें त्यानीं इकडे तिकडे पाहिलें कोणी जवळ नसलेले पाहून दाराशीं कानोसा घेतला

माधवजी एकदा ऑफिसात जाऊन द्रव्यार्जनाच्या चक्कीला जुपले गेले कीं टळटळीत तिन्ही साजा उलटेपर्यंत घरीं येत नसत या जाणीवेनें अगदीं बेफिकीरपणें मोकळेपणानें आतून रतनचा लाडिक हसरा आवाज येत होता मधेंच रुसून ती म्हणत होती—

" जाओ, जाओ, हू नही बोलू हवे आ शी मस्ती (जा गडे, मी नाहीं बोलायची आता हा काय दगा असा ! ) आत कोणीतरी हसत खिदळत, टेबल खुर्च्यांना धक्के देत लपडाव खेळत आहे असे आवाज येऊ लागले ते थाबल्यावर बागड्याचा आवाज आणि प्रेमानें भारावलेला, कानगुजल्यासारखा पुरुषी आवाज आला

" व्हाली, हवे नथी खमातु—जे थवानु होय ते थाओ—आजे हू शेटनें पूछवानो तारामाटे " (लाडके, आता नाहीं सहन होत जें होणार असेल तें होऊ देत, आज मी शेटजींना सागणार, प्रश्न टाकणार तुझ्याबद्दल ).

नीट शहानिशा करण्याच्या व्यवहारी बुद्धीने शेटजींनीं बाहेर स्वतःला आवरून धरले होते. हे शब्द आणि आवाज कानीं येताच मात्र रागानें त्याचीं बोटें वळू लागलीं हातातल्या काठीनें त्यानीं दारावर रागानें खडखड आवाज केला.

आतले आवाज एकदम थाबले एक मिनिटानतर रतनचा कापरा, भ्यालेला आवाज आला—" कोण छे ? "

माधवजींनीं त्वेषानें उत्तर दिलें—" तारो बाप ! "

आतून दार उघडले माधवजी हातात काठी घट्ट धरून आत धावले आणि रतनच्या अगावर ती ओढणार इतक्यात आतल्या तरुणानें त्याचा हात धरला—शातपणे तो म्हणाला—

" अपराधी हू छू—रतनबाई नथी—जे केहवु होय ते मने केहेजो, सजा करवी होय ते मने करजो— " ( अपराधी मी आहें, रतनबाई

नाहीं. जें सांगायचं असेल तें मला सांगा, शिक्षा करायची असेल ती मला करा. )

आपल्या आश्रित नोकरानें मुलीशीं हा अतिप्रसंग करावा आणि सर्वोवर कळस म्हणजे आपला हात धरावा यामुळें शेटजी रागानें थरथरू लागले गोविंदलालची मानगूट धरून त्यानीं त्याला फरफटत बाहेरच्या दारापर्यंत ओढीत नेलें आणि एक धक्का दिला–" निकळ साला अहींथीं–मों न बतावीश नहीं तो चीरी नाखीश–साप उछेऱ्योंमे घरमा " ( नीघ इथून, तोंड दाखवू नकोस मला, नाहींतर उभा चिरून टाकीन साप वाढवला मी घरात हा )

आत येऊन त्यानीं खोलींत रागानें नजर टाकली कोपऱ्यातल्या खुर्चीवर रतन बसली होती तिच्या डोळ्यात अश्रू होते. खालचा ओंठ थरथरत होता, पण वडिलाचा करारीपणा आणि निश्चय याचा छाप तिच्या तोंडावरही उठला होता तिची मुद्रा हटवादाने ताठल्यासारखी दिसत होती—माधवजी आत आल्यातर ती उठून उभी राहिली—आणि खालीं पहात म्हणाली—' लग्न करीन तर गोविंदलालशींच आमचं प्रेम आहे एकमेकावर—तेच आज विचारणार होते तुम्हाला '

ते रागानें उसळले—' गोविंदलालशीं लग्न ! त्या भिकारड्याशीं ! माझ्या घरीं नोकर म्हणून कुत्र्यासारखा तुकडा फेकला ज्याच्या अंगावर त्यालाच जावई म्हणून टिळा लावू मी ! — माझा लिफ्टमन् होण्याची योग्यता नाहीं त्याची, अन् त्याच्यावर माझ्या मुलीचं प्रेम ! मुंबईत श्रीमंत, सुशिक्षित दुसरे कमी पडलेत कीं काय या भिकारड्यावर भाळलीस तें ! '

डोळे पुशीत, कापऱ्या स्वरात रतन म्हणाली—" बाबा, अजून विचार करा, याचा परिणाम चांगला नाहीं होणार. पैशापुढें तुम्हाला माणसाची, गुणाची दरकार वाटत नाहीं–पैशासाठीं माझाही त्याग कराल तुम्ही ! काहीं म्हटलं तरी माझा निर्धार बदलणार नाहीं–मी ही तुमचीच मुलगी आहे लक्ष्यात ठेवा ! "

रागाच्या तिरिमिरींत तिला खसकन् लोटून देऊन माधवजी आपल्या खोलींत जाऊन कोंचावर पडले. रतनबद्दल बाळपणापासून

वाचलेले सारे अदाज, सान्या आशा धरणीकपातस्या हवेल्याप्रमाणें धडा-धड कोसळून पडत आहेत असें त्याना वाटत होतें

त्यानीं पत्नीच्या मृत्यूनतर रतनला अगदीं काळजीनें, नाजुक कळी-प्रमाणें वाढविलें होतें आपल्या खर्चात काटकसर करून त्यानीं तिच्या-साठीं एक युरोपियन नर्स ठेऊन दिली होती युरोपियन कॉन्हेंट स्कूलमध्यें तिला शिक्षण दिलें–तिच्या सर्व लीलाचें कौतुक केलें मोठी झाल्यावर एखाद्या स्वजातीय श्रीमत तरुणाशीं तिचें लग्न करून द्यावें आणि त्याला घरजावई करून आपल्या फर्ममध्ये ज्यूनियर पार्टनर म्हणून जोडून घ्यावें, शेवटीं सारा कारभार दोघाच्या हातात देऊन आपण निवातपणें "श्रीकृष्ण शरण मम" असा जप करीत 'श्रीनाथजीं'च्या सेवेंत उरलेले दिवस काढावेत असे सारे बेत त्यानीं आखून कायम करून ठेवले होते

थोडेसें नव्या युगाप्रमाणेंही वागावे म्हणून ते रतनला बरीच मोकळीक देत विजयराय नावाच्या एका श्रीमत कुलीन तरुणाला ते आपल्याबरोबर नेहमीं घरीं घेऊन येत रतनही त्याच्याबरोबर मोकळेपणानें बोलत चालत असे.

लाटेप्रमाणें हसत डुलत इकडून तिकडे फोनो रेडिओ लावताना, जाताना, चहा फराळ देताना तिच्यावर माधवजींचे डोळे ठरत नसत. तिचें शेलाटीसारखे सडपातळ, पण सळसळीत गोलसर बाध्याचें अग लाडिकपणें लवे–हसताना नाकातील हिऱ्याची चमकी हलून चमके गौर कपाळावर पुन्हा पुन्हा येणारी कुरळी बट सावरता सावरता तिला पुरेसें होई. तिच्याकडे पहात असता वात्सल्याच्या आनदानें माधवजींचे डोळे भरून येत. विजयरायजवळ ते तिची सारखी तारीफ करीत आणि या दोघाच मीलन आपल्याला किती प्रिय होईल हें रतनलाही उघडपणें सुचवीत.

मघा ऑफिसमधून आल्यावर रतनच्या खोलींतला हसण्या खिदळण्याचा आवाज ऐकून थोडावेळ त्याना बरे वाटलें आणि ते थाबले— त्याना वाटलें कीं विजयरायशींच रतन प्रेमाचे लपडाव खेळत आहे— परतु त्याच्या ऐवजीं आपला आश्रित गोविंदलाल निघाल्यावर त्याना अगदीं पिसाळल्यासारखें झालें. एवढा श्रीमत सुशिक्षित विजयराय टाकून

आपण नोकर म्हणून गुजरातेतून आणलेल्या अनाथ गोविंदलालवर रतनचें प्रेम का बसावें याचेंच माधवजींना कोडें पडलें.

त्याचें खरें कारण म्हणजे माधवजींची फाजील उत्कंठाच त्याना नडली विजयरायशीं प्रेमसंबंध जुळवून आणण्याचा ते हट्टानें प्रयत्न करीत होते आणि त्याची प्रतिक्रिया म्हणून रतनही त्याच्याबरोबर जितक्यास तितकेंच वागत असे व्यवहारी, आकडेमोडीच्या नियमित जगात वावरणाऱ्या माधवजींना प्रेमाच्या विचित्र हालचाली कशा कळाव्यात ?

बाल्य आणि तारुण्य याच्या संधिकालातल्या सहवासानें प्रेम वाढतें या कालात ज्या व्यक्तीचा सतत मोकळा सहवास होतो, मनातल्या आशा, आकांक्षा, विचार, विकाराची देवघेव होते, खेळीमेळीने सहज स्पर्श होण्याचे प्रसंग घडून येतात, एकांतात बोलण्याचालण्याचे प्रसंग येतात ती व्यक्ति रूपगुणानीं फारशी डोळ्यात भरण्यासारखी नसली तरी तिच्याबद्दल नैसर्गिक आकर्षणाने प्रेम उत्पन्न होतें एकदा असें प्रेम जडल्यावर मग त्याचे तोटे, दुसऱ्या व्यक्तीचे फायदे गुण वगैरे रुक्ष, व्यवहारी चर्चेचा निर्बंधाचा काहींएक परिणाम होत नाहीं पण व्यवहारी व्यापारी बुद्धीच्या माधवजींना हें कसें कळणार ? तसें कळले असतें तर त्यानीं गोविंदलालला घरीं ठेवलें नसते आणि रतनला त्याच्याशीं मोकळेपणानें वागूही दिलें नसतें पण आता पश्चात्ताप करून काय उपयोग ?

दोन दिवसानंतर चारदा आतबाहेर करून भीतभीत ‘ भट ’नें माधवजींना धीर करून सांगितलें—“ दोन दिवस झाले, रतनबाई जेवल्या नाहींत. खोलींत पडून राहिल्या आहेत आजारी दिसताहेत—आपण पहाव ” पण ‘ हू ’ म्हणून पानावरून उठून जाण्याखेरीज माधवजींनीं काही एक केलें नाहीं

एका घरात असून त्यांचा दोघांचा जीवनक्रम एखाद्या पथिकाश्रमातील परक्या व्यक्तींप्रमाणें चालला होता रोज ‘ भट ’ नें तिच्या खोलींत मुकाट्यानें थाळी नेऊन ठेवावी, दोन घास खाऊन ती ताट लोटून देई—आढ्याकडे पहात, कसला तरी विचार करीत ती तासन्

तास पडे. घरात नोकर माणसाखेरीज कोणीच नसल्यानें मायेनें विचार पूस कोण करणार !

पिता-पुत्रीच्या हट्टाची रस्सीखेंच चालली होती—असेच दिवस चालले होते आणि रतन कणाकणानें एका निश्चयाची उभारणी करीत होती.

माधवजींचा जीवनक्रम, व्यवसाय, यंत्राप्रमाणें सुरळीत, परंतु तित क्याच निर्जीवपणें मुकाट्यानें चालला होता सकाळीं चांदीच्या कपब शींतून केशर बदामाचें मसाल्याचे दूध, स्नानानंतर सोन्याची फ्रेम असलेल्या श्रीनाथजींच्या फोटोची पूजा, जप, आणि जेवणानंतर १०-३५च्या लोकलनें सेकंडक्लासच्या पासानें चर्चगेटपर्यंत प्रवास.

❦ ❦ ❦

साऱ्या दिवसाची उलाढाल आटोपून, संध्याकाळीं माधवजीशेट घरीं जाण्यास उठले पालवणकर हेडक्लार्क कानावर कॉपिंग पेन्सिल अडकावून हळूच त्याच्यापुढें येऊन उभा राहिला

दोन मिनिटानें वर पाहून माधवजीशेट गुरगुरले—" काय हाय ! "

—" आपली परवानगी असली तर सांगतों साहेब ! "

' भसने काय भसायचा ते ( बोल-बडबड-काय तें ) '

—" क्लार्कलोकाचा दोन महिन्याचा पगार दिला नाहीं साहेब. उद्यापासून सारे संप करून काम बंद ठेवणार आहेत मोठा टाइपरायटर मोडला आहे— बिल्डिंग इन्स्पेक्टरनें उद्यापासून लिफ्ट बंद ठेवायचा हुकूम दिला आहे—न ठेवल्यास खटला होणार आहे- "

" —अस्सा ! ये साला क्लार्कलोक एटला मगरूर झाला काय ! ते सगळाना डिसमिस् करून नवा लोक नीमून घे उद्यापासून तेच्यासारखा क्लार्कलोक आज पैला पचीस मिळते-टाइपरायटर लइ महाग झाला.. " कानावरील कॉपिंग पेन्सिलीशीं चाळवाचाळव करीत पाळवणकर धीर करून शेवटीं म्हणालाच.

—'साहेब, बिझिनेस चांगला तेजींत चालला आहे भरपूर फायदा होतोय्, मग आपण या लहान सहान गोष्टींसाठीं कशाला त्रास करून घेतां—आपली प्रकृतीही फार खालावल्यासारखी दिसतेय्—पांच वर्षांत

कधीं सुटी घेतली नाहीं आपण विश्रांतीसाठीं. आपण रागावणार नसलात तर सुचवितों कीं आपण आठपधरा दिवस माथेरानला जाऊन विश्रांति घ्यावी इकडची सारी व्यवस्था मी पहातों आणि दिवसातून दोनदा ट्रंक-टेलिफोननें रिपोर्ट देऊन आपले हुकूम घेतों लहान गोष्टींतल्या काट-कसरीचा, अतिश्रमाचा भलता परिणाम व्हायचा एखादे वेळीं सध्या आपण या एवढ्या चेकवर सही केलीत तरी पुरे—मी भागवितों त्यात सार " पालवणकराचें अगत्य, दूरदर्शीपणा आणि व्यवस्थेबद्दल माधव-जींना मनातून समाधान वाटले पण तें बाहेर न दिसू देता नेहमीच्या स्वरात म्हणाले—"बरा, बरा, तुमी तात्या लोक शिकावू नको आम्हाला पचीस वरसा बिझिनेस् करते, आमचा तबियतला काय धाड झाली हाय ! समदा ठीक हाय ते जवा दे आता आजचा सोदा आणि वायदेचा कागद काढ . "

मग एकदा त्या कागदात रगल्यावर घरीं जाण्याचीही माधवजींना आठवण राहिली नाहीं शेअर, सिक्युरिटींचे भाव, चढउतार, त्याचे तर्क, चेक्स, ड्राफ्टस्, निरनिराळया गिऱ्हाइकांचीं खातीं या साऱ्याच्या चक्रव्यूहातून ते सराइतपणें मार्ग काढीत होते

दीड तासानें सारे काम आटपून ते उठले बाकीचे सारे क्लार्क आपापलीं कामे आटपून केव्हाच घरीं निघून गेले होते. माधवजींनीं आपली पगडी डोक्यावर ठेवली. खास पाण्याच्या चबूतून एक भांडभर पाणी पिऊन, डोळयाना लावलें आणि काठीचा ठराविक टक् टक् आवाज करीत ते जरा समाधानानें ऑफीसबाहेर पडले

ते लिफ्टच्या दाराशीं आले तों लिफ्ट जागेवर नव्हता. अरुद, अधाऱ्या, खोल विहिरीच्या कडानीं पिळदार वेल खालीं लोंबत जावेत, किंवा साप सरपटत जावेत त्याप्रमाणें लिफ्टचे तारेचे सोल थेट वरच्या छतापासून तळमजल्यापर्यंत ताणले होते त्या चौकोनी बोगद्याच्या तळाशीं टेंकलेल्या लिफ्टमध्यें एक लहानसा दिवा तेवत होता आणि काहीं दुरु-स्तीचा आवाज येत होता माधवजींनीं घटेचें बटन दाबून ठेवलें. लिफ्ट वर येईपर्यंत तिचा कर्कश, हुकुमी आवाज येत होता.

आगगाडीचा डबा सपाट प्लॅटफॉर्मशीं येऊन उभा रहावा त्याप्रमाणें लिफ्ट हळू हळू वर येऊन सहाव्या मजल्याच्या तक्तपोशीला टेंकून उभा राहिला. आत जाऊन माधवजी उंच स्प्रिंगच्या मऊ कोचावर रेलले. स्विच्चा खट्कन् आवाज आला आणि 'सू ऽ ऽ ऽ ऽ' असा आवाज करून लिफ्ट खालीं उतरू लागला.

एखादा उत्तम लिफ्ट वेगानें खालीं उतरू लागला म्हणजे आपण ढगावर बसून तरंगत जात आहों कीं काय असा भास होत असतो. आज मात्र या लिफ्टच्या तारा खरखरत होत्या आणि मधून मधून त्याला विचित्र धक्के आणि हेलकावे बसत होते तिकडे लक्ष्य जाऊन शेटजी संता-पले—मिशातून बोट फिरवीत ते खेकसले—"मुफतचा पैसा खाते साला! ये लिफ्ट असा कसा चालते?—"

'—साहेब तारा झिजल्यात त्याच्या अगदीं कितीक दिवस झाले सांगतोंय् मी आपल्याला—उद्यापासून बंद करायचा सरकारी हुकूम आहे. खर तर आता देखील काढायला नको होता—पण आपण रागवाल...'

त्याच क्षणीं कुठेतरी ठाण्कन्—अगदीं कानठळ्या बसविण्या इतका प्रचंड आवाज झाला आणि सारी इमारत धरणीकंप झाल्याप्रमाणें हादरली.

पूर्णपणें ताणलेल्या धनुष्याची दोरी किंवा खेचलेली सारंगीची तात तुटली म्हणजे ताडकन् वर उसळते त्याप्रमाणें लिफ्टच्या वजनानें ताण-लेले मनगटा एवढ्या जाडीचे पिळदार पोलादी सोल तुटून छतापर्यंत वर उसळले.

सुदैवानें लिफ्ट एव्हाना चार मजल्याची उंची उतरून खालीं आला होता. शेवटल्या दोन मजल्याच्या उंची वरून एखाद्या गडगड णाऱ्या पिंपाप्रमाणें त्या अरुंद बोगद्यात धाड् धाड् आपटत तो खालीं कोसळला.

मृत्यूपूर्वीच्या काहीं क्षणात आपल्या साऱ्या गतायुष्याचा चित्रपट मनुष्याच्या भेदरलेल्या नजरेपुढून अकल्पित सपाट्यानें जात असतो. माधवजींच्या डोळ्यापुढें असाच प्रकार दिसला. आपल्या हट्टामुळें,

पैशाच्या हव्यासामुळें तुटलेले सगेसोयरे, मित्र, देश, मान, सुख, स्वतःची मुलगी आणि आता स्वतःचा जीव . .

पुन्हा एकदा जोराचा आवाज झाला. एखादी दगडी गोटी फरशीवर पडून उसळावी त्याप्रमाणें तळाशीं असलेल्या यंत्राच्या भुयारावर लिफ्टचा पोलादी तळ आपटून तो वर उसळला.

थोडयाच क्षणाचा हा कारभार. सगळीकडे हाहाकार उडाला. प्रचड आवाजामुळे तेथें लोकाची एकच गर्दी उडाली होती. पालवणकर ऑफीसला कुलुप लावून जिन्यावरून खालीं येत होता तों हा प्रकार त्याला दिसला माधवजी आणि लिफ्टमन् यांचीं बेशुद्ध शरीरें बाहेर काढण्यांत आली.

आतील स्प्रिंगच्या मऊ कोंचावरून लिफ्टच्या छतापर्यंत उसळून, मार बसून, माधवजी पुन्हा त्या कोंचावरच आदळले होते. त्या धक्क्यानें आणि मुक्या मारानें ते बेशुद्ध पडले परतु त्याना फारशी इजा मात्र झाली नव्हती—थोडयाच वेळानें ते शुद्धीवर आले त्या मानानें लिफ्टमन्ला फार मार बसला होता–त्याचा एक खादा त्या मारानें उतरून डोक्यालाही सपाटून जखम झाली होती बेशुद्ध स्थितींतच त्याला इस्पितळात न्यावें लागलें.

भोंवती जमलेले पोलीस आणि वृत्तपत्राचे रिपोर्टर यानीं प्रश्न विचारून विचारून पालवणकराला बेजार केलें झिजून झिजून कमकुवत झालेले लिफ्टचे दोर अचानकपणें तुटून हा अपघात झाला असें त्यानें दहावणाना तरी सागितले असेल प्राथमिक उपचारानतर घाबरण्यासारखी इजा नाहीं म्हणून डॉक्टरनें सागितलें मात्र पूर्ण विश्राति घेतली पाहिजे म्हणून बजावलें ॲम्ब्युलन्स मोटारमधून पालवणकराबरोबर शेटजींची रवानगी साताक्रूजला करून डॉक्टर निघून गेले.

माधवजींची मोटार साताक्रूजच्या बगल्याशीं येण्याच्या सुमाराला त्याच्या दाराशीं दुसरी एक मोटार तेथें उभी होती. आंत सूट-केसेस आणि लहान पेट्या रचून ठेवल्या होत्या आणि शेटजींचे सारे नोकर भोंवताली चुळबूळ करीत उभे होते.

रतन जड पावलांनीं बंगल्यातून बाहेर आली आणि टॅक्सींत बस-ल्यावर तिनें गड्याला जवळ बोलविलें त्याच्या हातात एक बंद पाकीट आणि पाच रुपयाची नोट टाकली —" माळी, तू नी घाटण, आपसमदी ये रुपिया वाटून घेवा, शेटसाहेब आले मजी त्येना ये कागद देवा "

कंठ दाटून येऊन तिनें हाताच्या इशाऱ्यानेंच त्याना जाण्यास सांगि तलें ड्रायव्हरने खाडकन् मागचें दार लावून घेऊन सेल्फ स्टार्टर दाबला आणि टॅक्सीनें पुढे उडी घेतली इतक्यात तांबडे स्वस्तिक वर असलेली एक लांबलचक पांढरी अ‍ॅम्ब्युलन्स कार दाराशीं येऊन थांबली—ती पाहा-ताच रतनच्या पोटात धस्स् झालें—

टॅक्सीकडे पाहून पालवणकर गाडींतूनच ओरडला—'रतनबाई !—' आणि त्याने बाहेर उडी टाकली

टॅक्सी, सामान, पत्र, गोविंदलाल, स्वतःचे बेत या साऱ्याचा क्षणात रतनला विसर पडला एका स्ट्रेचरवरून माधवजीशेटची डोळे मिटलेली मूर्ति पालवणकर आणि अ‍ॅम्ब्युलन्सचे नोकर आत उचलून नेत होते—ते पाहून टॅक्सींतून उडी घेऊन रतन वेड्यासारखे बडबडत, धावत, आत निघाली—

—" काय झालं हें बाबा ! डोळे उघडाना ! पहा मी तुमची रतन आहे—मी हाक मारतेय्—रागावलात का माझ्यावर ? मी जात नाहीं हो. अगदीं तुमच्याजवळ राहीन सगळं तुमचं ऐकीन पण बरे व्हाल ना तुम्ही लवकर—बोलाना बाबा "

साऱ्यानीं मिळून माधवजींना पलंगावर निजविलें तेवढ्यात घड-लेला प्रकार पालवणकरानें रतनला थोडक्यात सांगितला

बाहेर टॅक्सीवाला हॉर्न वाजवून दमला रामा गड्याने चाणाक्ष-पणें सारा रागरंग ओळखला मुकाट्यानें टॅक्सीतलें सारें सामान काढून गुपचुप रतनबाईच्या खोलींत नेऊन ठेविलें, आणि बटव्यातला रुपाया काढून ड्रायव्हरच्या हातावर टाकला आणि जरा हसत म्हणाला—

—" उगाच का बोंब मारतास् ? मुकाट जा परता आता तुज्या रस्त्यान्. आमची रतनबाय् पळून जात होती तुज्या मोटॅरीतून. तो गोविंद-

लाल घोंवू होवा होता म्हणून—पन आता शेटजीच बिमार झाला, आता काय पलताय् जा मुकाट— ”

चागले गिऱ्हाईक हातचे गेले म्हणून चरफडत ड्रायव्हरनें निशाण वर केलें आणि टॅक्सी सुरू केली

माधवजींना झोंप लागलीशी पाहून रतन मुकाट्यानें आपल्या खोलींत गेली सार्‍या पेट्यातलें सामान पुन्हा कपाटात भरून ठेवलें. रामाजवळचे पत्र परत घेऊन त्याच्या चिंध्या करून टाकल्या. आपण मोटारींतून पळून जात होतों ही गोष्ट कोणीही माधवजींना सागू नय म्हणून सार्‍या गडी मोलकरणींना ताकीद दिली

पालवणकर आणि शेजारी पाजारी गेल्यावर रतननें आत जाऊन स्वतः एक कॉफीचा कप तयार केला आणि तो घेऊन ती माधवजींच्या खोलींत गेली कप टेबलावर ठेवून हलक्या पावलानीं ती त्याच्या डोक्याशीं येऊन बसली आणि त्याच्या तुरळक, पाढऱ्या केंसावरून हळू हात फिरवू लागली

कितीक वर्षे झालीं असतील आपण इतक्या सलगीने आणि प्रेमानें त्याच्या उशाशीं बसलों नाहीं याची आठवण तिला झाली माधवजीही कधीं असे स्वस्थ पडले नव्हते -सदा त्याची घाई, घडपड आणि ओरड पलगा समोरच रतनच्या दिवगत आईचा मोठा फोटो टागला होता तिकडे रतनची नजर गेली पश्चात्तापानें तिने खालीं पाहिले, माधवजींच्या तोंडावरून हळूच हात फिरविला आणि पाघरूण नीट ओढून घेतलें

रोज पाहिल्यामळें इतक्या वर्षांत माधवजींच्या बदलत्या चेहऱ्या-वरील फरक रतनला जाणवला नव्हता पण आता मिटल्या डोळ्यानिशीं निश्चल पडलेल्या पित्याकडे पाहून त्याच्या वृद्ध, वयस्क, स्वरूपाची तिला एकाएकी जाणीव झाली आणि धक्काच बसला

सतत व्यापाराच्या उलाढाली, काळजीमुळें त्याच्या कपाळावर खोल समातर रेषा उमटल्या होत्या त्यापैकीं एक दोन रेषा तरी आपल्या हट्टी वागण्यामुळें आणि आग्रहामुळें नव्यानें आल्या असाव्यात या विचारानें तिला अगदीं ओशाळल्यासारखें झालें. डोळ्याच्या बाजूना, कडांना

तीन तिरव्या रेषा कोन करून मिळाल्या होत्या डोळ्याखालचा भाग मासल, फुगीर होऊन जरा खालीं लोंबल्यासारखा दिसत होता नाकपुड्या-जवळून निघालेल्या दोन त्रिकोणाकृति रेषा ओठाच्या कोंपऱ्याना येऊन मिळाल्या होत्या झोंपेंतच त्यानीं जरा जोरानें श्वास घेतला म्हणजे त्या हलत

रतनचा स्नेहल हात माधवजींच्या कपाळावरून फिरत होता अनेक वर्षातलें दुरावलेलें पितृप्रेम त्या स्पर्शातून प्रकट होत होते माधवजी जागे झाले तरी ही स्नेहसमाधि भंगण्याच्या भीतीनें ते डोळे मिटूनच आनंदानें स्वस्थ पडले होते त्याच्या मनातून वात्सल्याचे विचार धावत होते

—'प्रेमासाठीं भाडली तरी माझी रतन किती प्रेमळ आहे! अगदीं तिच्या आईची हुबेहूब मूर्ति तिला किती तोडून बोललों होतों मी! तिची आई आज असती तर तिने रतनचीच कड घेतली असती आता त्या प्रेमाची वाण मी भरून काढायला नको का? देव करतो तो बऱ्यासाठींच म्हणायच—एकूण लिफ्ट मोडून अपघात झाला, त्या निमित्तानें तरी मनातली अढी काढून, आज रतननें इतक्या प्रेमाने माझ्याजवळ बसून माझी शुश्रुषा केली, आणि आपणही हट्टानें चुकीच्या मार्गानें जात आहोंत हे मला कळलें. हा अपघात झाला नसता तर हे गैरसमज आघळ्या तेढीने, अटीतटीनें असेच वाढत गेले असते, आणि आम्ही दोघानीं कदाचित् साऱ्या जन्मात एकमेकाचे तोंडही पाहिले नसतें

रतनचे बिचारीचे तरी काय फार म्हणणें आहे?—त्या गोविंदलालशीं लग्न करायच एवढच तस पाहिल तर तो मुलगाही सालस, अन् कर्तबगार आहे रतनला खरोखरच सुखात ठेवील तो पण केवळ तो माझा आश्रित अन् गरीब, त्याला बरोबरीच्या नात्याने जावई कसा करून घ्यायचा या अहंपणामुळें मी त्याच्या लग्नाला अडकाठी केली

बाकी काही झाल तरी माझी रतन आज्ञाधारक खरी गोविंदलालला घरातून घालवून दिला तेव्हापासून तिच अन्न तुटल—मनात झुरत राहिली पण कधीं वर मान करून, उद्धटपणें बोलून माझी अवज्ञा केली नाहीं तिन—असावी तर अशी असावी मुलगी—नाहींतर आजच्या

मुली! 'नाहीं' म्हटल म्हाताऱ्या बापान, तर खुशाल न कळविता, टॅक्सी करून राजरोस घराबाहेर निघून जाऊन मनासारख लग्न करून राहिली असती एखादी. आता तिच्या चागुलपणाचा अत पहाण बर नाहीं.

असे हजार विचार चालले होते त्याच्या मनात एवढ्यात त्याच्या कपाळावर एक ऊन थेंब पडला त्यानीं दचकून डोळे उघडले रतन डोळे पुसून गद्गद आवाजात म्हणाली—"बाबा, क्षमा कराल का मला? फार मनाविरुद्ध वागलें मी तुमच्या—आता मात्र कध्धीं–कध्धीं तुमच्या शद्वाबाहेर जाणार नाहीं—पण लौकर लौकर बरे व्हाल ना तुम्ही?"

तिच्या आर्जवी शब्दानीं आणि क्षमा मागण्यानें माधवजींना अधिकच ओशाळल्यासारखे झालें रतनचा हात हातात घेऊन ते म्हणाले—'किती वाळलीस तू–इतक्या वर कधीं गेल्या नव्हत्या तुझ्या रागड्या–माझी कसली क्षमा मागतेस? खर म्हटल तर मीच तुझी क्षमा मागितली पाहिजे. मीच हट्टीपणाने, माझ्या अहकारान तुला त्रास दिला, तुझ्या प्रेमात मोडता घातला आता माझ्यासाठीं बरबर तू नको म्हणालीस तरी गोविंदलालशींच तुझ लग्न लावून देणार आहे मी—माझ्या जवळच रहाल ना दोघही, कधीं नाहीं ना अतर देणार या म्हाताऱ्याला?'

—उत्तर न देता रतननें आपलें डोकें माधवजींच्या हृदयावर टेकलें.

❧ ❧ ❧

दुसऱ्या दिवशींच्या मुम्बईच्या वृत्तपत्रात भडक बातम्या प्रसिद्ध झाल्या—

भयकर अपघात!

मुबई ता २१—'माधवजी अॅड् को' या प्रसिद्ध व्यापारी पेढींतील विजेचा पाळणा काल चालू असता एकाएकीं तुटून पडला लिफ्टमनला बराच मार बसल्याने त्याला इस्पितळात पोंचवावें लागलें आहे पेढीचे मालक माधवजीशेट मात्र बसल्या जागीं स्प्रिंगच्या कोचावरच आपट ल्यामुळें त्याना फारशी इजा झालेली नाहीं लिफ्टमनच्या कुटुबाच्या निर्वाहासाठीं आणि शुश्रुषेसाठीं योग्य ती रक्कम पाठवून, या अपघातातून वाचल्यामुळें माधवजीशेट यानीं येथील अनाथालयाला एक मोठी रक्कम देण्याचें वचन दिलें आहे असें कळतें."

या आजारीपणात शेटजींना अनेक नवे अनुभव आले आणि त्याचा स्वभाव आपोआप बदलला या अपघातातून परमेश्वरानें आपल्याला वाचविलें त्याचे आपण सत्कृत्यानीं चीज केले पाहिजे अशी त्याची दृढ भावना झाली आधींच्या त्याच्या धार्मिक वृत्तीमुळें या प्रकारात फारसें नवल नव्हतें— मुख्य फरक म्हणजे पैसा पैसा म्हणून आपण जन्मभर झगडलों, साऱ्याशीं ताठरपणे वागलों, त्या पैशाचा अशावेळीं किती थोडा उपयोग आहे हें त्याना कळून चुकलें. दररोज त्याच्या पेढींतील कारकून मडळी भीत भीत येऊन बाहेरच्या बाहेर पण अगत्यानें चौकशी करून जात कधीं कोणा नोकराबरोबर कामाव्यतिरिक्त एक शब्द न बोलणारे माधवजी—पण त्याच नोकराचे अगत्य पाहून आता त्याना ओशाळल्यासारखे होई त्याना आत बोलवुन, चहापाणी देऊन ते त्याच्याशीं मोकळेपणानें चार शब्द बोलू लागले

'तात्यालोक' म्हणून उपहास केलेल्या पालवणकर हेडक्लार्कमधील गुणही आता त्याना हळू हळू कळून येऊ लागले अपघातातून घरीं पोंचविण्यापासून, औषध आणणें, रोजच्या व्यापारी बातम्या सागणें, शेटजींच्या गैरहजरींत पेढीचा सारा कारभार सुरळीतपणे चालविणे या त्याच्या कर्तबगारीमुळें त्याना त्याच्याबद्दल आदर वाटू लागला नेहमींप्रमाणें कानावर कॉपिंग्पेन्सिल ठेवून 'साहेब!' म्हणून त्याने आदराने बोलण्यास सुरवात केली म्हणजे नोकराऐवजी आपला एक आस्थेवाईक मित्रच बोलत आहे असे त्याना वाटू लागले

अपघातानें बिछान्यावर पडलेले माधवजी, आणि पधरा दिवसानीं हिंडू फिरू लागलेले माधवजी हे एक कीं दोन याची शका येण्याइतका फरक त्याच्या जीवनात आणि स्वभावात आता पडला होता

—इतकीं वर्षे वाघाप्रमाणें उग्र, करारी आणि हट्टी असणारे माधवजी आता एकाएकीं इतके का माणसाळले?

—कजूष आणि कवडीचुंबक म्हणून आख्या मुंबईच्या पेढींत प्रसिद्ध असलेल्या माधवजींनीं अनेक सस्थाना इतक्या सढळ देणग्या का दिल्या?

—त्याच्यासारख्या लक्षाधीशानें आपल्या मुलीचें लग्न गोविंदलाल सारख्या गरीब, पोरक्या, आणि एकवेळ आपला नोकर असलेल्या तरुणाशीं का करून दिलें ?—त्याच्या हातात साऱ्या पेढीचा कारभार का दिला ?

—जन्मभर पैसा पैसा करून, बेपर्वाइनें वागणारे माधवजीशेट आता माधवबागेंत ' श्रीकृष्ण शरण मम ' म्हणून तासचे तास माळ फिरवीत का बसू लागले ?

या व अशा अनेक प्रश्नांचें त्याच्या समव्यवसायी व्यापाऱ्याना आणि दूरच्या आप्ताना कोडेंच पडू लागले कोणी स्पष्ट प्रश्न केलाच तर ते जरा हसून ' प्रभूनी आज्ञा ' असे म्हणतात, पण मनातल्यामनात त्याचें अर्धे श्रेय तरी ते वरून कोसळलेल्या ' विजेच्या पाळण्याला ' देतात.

---

## ६ : सतीचें वाण

not- Bad
one can read it

' कॉलेजात तुमच्या मते अत्यत खळबळ उडवून देणारा प्रसग कोणता ? "

हा प्रश्न निरनिराळ्या विद्यार्थ्यांना विचारला तर अनेक प्रकारचीं उत्तरें येतील एखादा उत्सवप्रिय विद्यार्थी गॅदरिंगचे नाव घेईल.

एखादा म्हणेल— जिमखान्याची निवडणूक

एखादा पिंजारलेल्या केसाचा, चष्मेवाला स्कॉलर तर ' परीक्षा ' म्हणूनहि उत्तर देईल !

परतु बिनटोपीवाला, रुद पायजमेवाला, शेवटच्या बाकावर बसून स्टॅपिंगचा चौघडा बाजविणारा आजचा अस्सल विद्यार्थी मात्र मिस्किल पणें हसून हटकून म्हणेल—

" एखाद्या अनोळखी प्रोफेसराचे वर्गांतलें पहिलें व्याख्यान ! "

बहुतेकाना हेंच उत्तर बरोबर वाटेल निदान आज तरी

बी. ए च्या वर्गात नेहमीच्या सख्येपेक्षा दुप्पट विद्यार्थी आज खेचून भरल्यानें त्या मोठ्या हॉललाहि रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्याची कळा आली होती. प्रोफेसर वर्गावर येण्यापूर्वीचा, दोन तासाच्या मधला चार—पाच मिनिटाचा काळ म्हणजे विद्यार्थ्यांना गोंगाट करण्याची

हकाची रजा! कोणी शिट्या फुकीत होते, कोणी पारव्यासारखे घुमत होते, कोणी माजरासारख आवाज काढीत होते, तर कोणी शहरात चालू असलेल्या लोकप्रिय बोलपटातील उडत्या चालीच्या तालावर बाकाचा तबला, पखवाज करून ठेका धरीत होते त्या धडधडाटानें उडालेल्या धुळीनें ठसका लागून पुढील बाकावरील मुली तोंडाशीं रुमाल धरून खोकत मागें रागाच्या नजरा टाकीत होत्या.

दुसरी घटा झाली व उत्सुकतेची एक लाट वर्गावरून थरारून गेली.

अगावर काळा पायघोळ झगा, डोळयाना बिनफ्रेमचा चष्मा, उच, कृश अगयष्टि अशी एक मूर्ति आत येऊन झपझप पावलें टाकीत उच्चासनावरील टेबलाशीं येऊन उभी राहिली त्याच्या पहिल्या पल्लेदार नजरेंत सारा वर्ग सामावला

वयानें तरुण असूनहि प्रो दिवाकराच्या कपाळाच्या दोन्ही बाजूच्या केसानीं बरीच पिछेहाट केली होती त्याच्या रुद कपाळावर भुवयाना समातर अशा विचाराच्या रेषा अगदी आखल्यासारख्या खोल उमटल्या होत्या. वर्गाकडे लागलेल्या त्याच्या नजरेत बुद्धिमत्तेच्या चमकेबरोबर चिंतेचा, जगात सोसलेल्या दुःखाचा तरलसा भावहि अस्फुटपणें डोकावत होता

त्याच्या शात, सथ भाषणाबरोबर पहिली मिस्किल आणि लढाईच्या तयारींत असलेली वर्गाची वृत्ति बदलून एक गभीर वातावरण उत्पन्न झाले, आणि आपण करून ठेवलेल्या तयारीच्या जाणिवेने काहीं मागील बाकावरील विद्यार्थ्याना ओशाळल्यासारखेहि वाटू लागलें. बाहेर काढलेले कागदी बाण त्यानीं पुन्हा खिशात घातले.

आतून अस्वस्थ चित्तानें, परतु बाह्यतः अगदी शात वृत्तीनें प्रो दिवाकराचें प्रास्ताविक व्याख्यान सुरू झालें होतें. पहिली उत्सुकता तृप्त झाल्याने कटाळून, आता अभ्यासाची चर्पटपजरी सुरू होणार या जाणिवेनें मागील काहीं विद्यार्थ्यांनीं पुस्तकाचा आडोसा करून डुलकी घेण्याची तयारीहि केली, परतु वर्गात सहसा न ऐकू येणारे काहीं नवीन शब्द ऐकून त्यानीं कान टवकारले! प्रो. दिवाकर उत्साहानें बोलत होते—

"अभ्यासाकडे वळण्यापूर्वी या पहिल्या भेटींत मित्रत्वाच्या नात्यान दोन शब्द बोलण्याची माझी इच्छा आहे. सध्याची व्याख्यानद्वारा शिक्षणाची पद्धति असेपर्यंत तरी एक वक्ता नी हजार श्रोता ही स्थिति असणार, आणि विद्यापीठान आखून दिलेल्या क्षेत्रापलीकडे डोकावण्याची संधि अध्यापकालाहि मिळणार नाहीं हे उघड आहे परतु आहे या आपल्या परस्पर सबधात तरी काही विशिष्ट दृष्टि असावी अशी माझी इच्छा आहे.

"मला वाटत, कीं आजचा अध्यापकवर्ग आणि विद्यार्थीगण यामध्यें गैरसमज आणि तुटकपणाची एक अदृश्य अशी भिंत उभी आहे. अध्यापकाची अरेरावी आणि विद्यार्थ्यांची बेशिस्त याबद्दल हल्ली होणारी टीका ही या गैरसमजामुळच उत्पन्न झाली असावी आपण विद्यार्थ्यांपेक्षा उच्च दर्जाचे, कोणीतरी बडे आहोंत अशी काहीं अध्यापकाची वृत्ति जागृत झाली म्हणजे त्याला प्रतिक्रिया म्हणून बेशिस्त, कुचेष्टा वगैरेची परतभेट त्याला मिळते. तेंव्हा ही मनोवृत्तीच काढून टाकून आपण सर्व काहींतरी जीवितकर्तव्य करण्यासाठीं, ध्येयपूर्तीसाठीं वर्गात एकत्र येतों असा निर्धार करून, मित्रत्वाच्या नात्यान या कार्यातील एकमेकाच्या अडच-णींचा आपलेपणान विचार केल्यास बरच कार्य होईल अस मला वाटत अध्यापकाच्या पोकळ दराऱ्यापेक्षा, मित्रत्वाच, सहकार्याच व खेळीमेळीच नातच मला अधिक प्रिय वाटेल, अशा सहकार्यासाठीं मी आपला हात पुढें करीत आहे–तो मित्रत्वाच्या नात्यानें स्वीकारणें न स्वीकारणें आपल्या कडे आहे."

दिवाकर उत्साहाच्या भरात बोलत होते आणि मधूनमधून पड णाऱ्या टाळ्यावरून ही भूमिका त्याच्या वर्गालाहि पसत असावी असें दिसत होतें परतु मध्येंच ते एकाएकी दचकून थाबले !

एखादा मोत्याचा सर काळजीनें, हळुवारपणें फिरवीत असता तो एकाएकी तुटून त्यातील सारे मोती ओघळून त्याची पागापाग व्हावी असेंच एकाएकी दिवाकराना वाटू लागलें. बोलण्याच्या भरात समोरच्या बाका-मागें त्याची नजर गेली—आणि तेथेंच खिळली !

त्याच्या तोंडातला शब्दहि अर्धाच तुटला ! पण सरावानें सावरून घेऊन त्यानीं तो विषय अर्धाच सोडून अभ्यासक्रमाच्या पुस्तकाची ओळख करून देण्याचें ठराविक ठशाचें व्याख्यान सुरू केलें.

पण आता त्यात पूर्वीची चमक उरली नव्हती !

समोर मुलींच्या घोळक्यात सुरेखाचें तोंड गोरेंमोरें झालें होतें. खालीं मान घालून ती कपाळावरचा घाम टिपीत होती बाकावर टेक लेला तिचा रुमालाचा हात थरथर कापत होता "मला बर नाहीं वाटत, जातें बाई मी " शेजारच्या मुलीजवळ पुटपुटून, उबऱ्याशीं अड-खळत ती निघून गेली

तिच्या पाठमोऱ्या मूर्तीबरोबर दारापर्यंत गेलेले वर्गाचे गोंधळलेले प्रश्नार्थक डोळे दिवाकराच्या चेहऱ्यावर लागले

मनुष्याचे विचार जर मूर्त रूपाने दिसणारे असते, तर तर्क वितर्कांच्या आडव्या–उभ्या धाग्यानीं विणलेला एक प्रचड तबूच वर्गाच्या डोक्यावर उभारलेला दिसला असता !

उरलेल्या वेळात विषयाचा समारोप करतानाच तासाची घटा झाली आणि हायसें होऊन स्टॅपिंगच्या सलामीबरोबर प्रो. दिवाकर वर्गा-बाहेर पडले

❦ ❦ ❦

अध्यापकांच्या दालनात सहकाऱ्यानीं हालहवाल विचारली, कारण एखाद्या नवख्या अध्यापकानें कॉलेजचा तो वर्ग पहिल्यादा शिकवून गडबड झाल्याशिवाय पार पडणें हें एक अग्निदिव्यच समजत. ते आल्या-बरोबर गोंगाट झाला—

" अरे वा ! बरीच मोहनी टाकलेली दिसते तुम्ही ! चागल्या-चागल्याना बाहेर काढल आहे या वर्गान " एक सहकारी म्हणाला.

" मला तर बरीं दिसलीं मुल ! मला नाहीं वाटत फारसा त्रास देतील तीं " दिवाकर उत्तरले.

" अहो, तुम्हाला अनुभव नाहीं म्हणून म्हणता अस ! एकदा चागला हात दाखविला म्हणजे कळेल ! अनुभवाच बोलण आहे आमच.

दोन वर्षांमागं अशी उडवलीय् आम्हीच त्या—याची!" बी ए. होऊन नवीनच टयूटर म्हणून नेमणूक झालेल्या तरुणानें त्याना हटकलें.

"अहो, तुम्ही म्हणून या वर्गांत तासभर गप्पा मारल्यात! आम्ही गेलों असतों तर धुव्वाच उडविला असता आमचा पाच मिनिटात!" एक लेक्चरर कचरत म्हणाले

"म्हणजे त्याच अस आहे. ' चष्मा पुशीत मुख्याध्यापक सागू लागले.

"थॅक्स-" म्हणून आपल्या छोट्या खोलींत जाऊन दिवाकरानीं खुर्चीवर अग टाकलें अस्वस्थ चित्तान त्यानीं एक सिगरेट शिलगावली. कॉलेजच्या उच अधाऱ्या छपराभोंवती फेसाळणाऱ्या धुराच्या छतावर त्याना वर्गात दचकलेल्या सुरेखाची, अनेक वर्षांनीं अकस्मात् दिसलेली मूर्ति दिसू लागली त्या अधुक लाटावर इच्छा नसताहि त्याच्या पूर्वस्मृतींचा नाच सुरू झाला

  

दिवाकर आणि सुरेखा—अगदी बालपणापासून, प्रेम हा जोडाक्षरी शब्द त्याच्या जिभेला उच्चारताहि आला नसता तेव्हापासून—काहींतरी अदृश्य शक्तीनें एकमेकाकडे ओढलीं गेलीं होतीं त्याना जवळ नेणारी शक्ति प्रेमापेक्षा सहानुभूति, आत्मनिवेदन नी सरक्षणाचीच होती मुसळधार पाऊस पडत असावा, आणि दोन अनोळखी व्यक्तींनीं रक्षणासाठीं गळत्या पाघोळ्यामागील छपराचा आसरा घ्यावा तसे ते दोन जीव एकत्र आले होते. घरात कोणालाहि राग आला कीं तो नेमका दिवाकरावर निघे, आणि सुरेखा तर तिच्या घरात साऱ्याचा पायचेंडूच झाली होती कोणी रागानें, कोणी थट्टेनें, कोणी कुचेष्टेनें, कोणी उगीच रिकामपणाची गमत म्हणून तिला लाथाडावें! कारण अप्रतिकार आणि शातपणा हेच त्याचे दोष होते. आणि या प्रसगाच्या बधानींच ते एकत्र बाधले गेले होते. बालपणाची प्रसन्न खोडकर वृत्ति जाऊन तीं दोघेंहि जरा एकलकोंडी, अतर्मुख आणि उगीचच विचाराचीं विणकरीं झालीं होतीं

वाढत्या वयाबरोबर हा एकमेकाचा आसरा नि सहवास कायमचा व्हावा अशी आशाहि त्याच्या मनात घर करून राहू लागली. परंतु!—

दूरच्या वस्तू स्पष्ट दिसाव्या, परंतु जवळच्या दिसू नयेत असा एक दृष्टीचा विकार असतो विशेषतः उपवर मुलींच्या बापाना तो हटकून होण्याचा संभव असतो

सुरेखासाठीं शेकडो मैलाच्या दूरच्या गावाच्या नगरप्रदक्षिणा करणाऱ्या बाबासाहेबाना शेजारच्याच घरातला दिवाकर मात्र दिसला नाहीं!

—"दिवाकर का? अः! त्या भिकारड्याला कोण मुलगी द्यायला बसलय्!" ते तिरस्कारानें म्हणत.

ती कुणकुण ऐकून दिवाकरच्या आईसाहेबहि प्रतिकार म्हणून बायकात बोलत—

"सुरेखा व्हका! इश्श! असली रडवी, कुढी अन् घुमी सून नको आमच्या घरात माझा 'दिवा' बी ए झाला म्हणजे हजार मुली येतील लोटांगण घालीत सागून त्याला! अन् काय बाई तरी—आम्हाला गरीब म्हणायला जशी काय त्याच्या घरावर सोन्याचीं कौलच चढलींत! माझ्या माहेरच्या नात्याची सुशीला शभरपट उजवी आहे त्या पोरीहून."

या दोन कुटुंबाच्या अहमन्यतेंत, चुरशींत आणि हटवादात, लग्नावाचूनच दिवाकर अन् सुरेखाच्या भावनाच्या पायघड्या मात्र तुडविल्या जात होत्या

दिवाकराच्या परीक्षा यथाक्रम चालल्या होत्या "पोरीची जात" म्हणून मॅट्रिक झाल्यावर आईसाहेबानीं सुरेखाला घरींच ठेवले होतें.

चित्रपटाच्या गुडाळीप्रमाणें कालाचे चक्र उलगडत, फिरत, भिर भिरत जात होतें, आणि त्याच्याप्रमाणेंच क्षणाक्षणाला बदलतीं चित्रे दाखवीत होतें.

एके दिवशीं आई अत्यवस्थ असल्याची तार दिवाकराच्या रेसिडेन्सीच्या खोलींत आली आणि दिवाकर पुढल्याच गाडीनें आपल्या गावीं गेला आईसाहेब शेवटले दिवस मोजीत होत्या. त्यानीं दिवाकराच्या पाठीवरून हात फिरवला, त्याचे डोळे पुसले—

"दिवा! बाळ, मी तर चाललें आता तिकडच्यापेक्षा मला तुझीच भारी काळजी वाटते! भोळा साब आहेस तू! अगदीं हळव्या मनाचा—व्यवहार म्हणतात तो अगदीं नाहीं तुला जगात टोचून टोचून खातील सारे तुला! तुझी काळजी घ्यायला, आपलेपणान खस्ता खायला एखादी चलाख सून घरात आणली म्हणजेच माझे डोळे सुखान मिटतील. बाळ! देशील का मला एवढ शेवटल समाधान!"

"आई, मग सुरेखा नाहीं का! तिच्यावरच का तुझा इतका राग!"

—"नाव नको घेऊ त्या कारटीच माझा मुलगा असलास तर!" माझा अपमान करून, वरल्या नाकान नकार देणाऱ्या बापाची मुलगी मी पाया पडत जाऊन घरात आणू की काय?—अ—देवारे!"

अमानें आईसाहेब कण्हू लागल्या जिवाचा सुभ जळत आला तरी अभिमानाचा पीळ मात्र नाहींसा झाला नव्हता

चमचानें पाजलेला पाण्याचा घोट घेऊन त्या पुन्हा बोलू लागल्या

"बाळ दिवा! तुझ्या हटवादान सुखाच मरणसुद्धा लाभू देणार नाहींस ना रे मला! करीन तर तुलाच सून करीन म्हणून सुशीलेला कधींच वचन देऊन ठेवल होत मीं. मेल्यावरहि जाळीत राहील मला. किती शांत नी आज्ञाधारक म्हणून म्हणाव मीं तुला! का आता अत पहातोस माझा!"

आणि पतहि त्याच वेळेस आत येऊन बिछान्याजवळ बसले—

"हें पहा दिवाकर! आता हिची शेवटची इच्छा मानण न मानण तुझ्यावर आहे. आतापर्यंत तू आम्हाला शब्दानहि दुखवल नाहींस हें लक्षात आहे आमच्या. हिच्या मृत्यूच्या वेळीं तरी तू आता तें व्रत मोडू नयेस. कर्तव्य समज, स्वार्थत्याग समज, हव तें समज, पण तिचा शेवटला शब्द मोडू नयेस तू ही तर जाणारच आता—" पताचा आवाज कठोर होऊन जरा वरच्या पट्टींत चढू लागला. "अन् तिच म्हणण ऐकल नाहींस तर आईबरोबर बापहि मेला म्हणून समज तू. हें सार पुण्य तुझ्यावर आहे बाबा!"

दिवाकर काहीं न बोलता उद्विग्नतेनें उठून गेला.

सध्याकाळीं सुरेखाची गाठ घेऊन, तिच्या वडिलाची समजूत करून काहीं मार्ग काढता आला तर पाहावे म्हणून दिवाकर जवळच वाड्यात गेला, तर ती जागा त्याच्या मनासारखीच ओसाड अन् भकास होऊन मोकळी पडली होती ! त्यानें विचारपूस केली

" कोण जोशी का ! ते तर दोन महिन्यापूर्वीच बदलून गेले इथून कुठसे ! "

" अन् सुरेखा ? "

" हा मेल्यानों ! काय विचारण तरी ! अहो बापाबरोबर मुलगी जायचीच विचारायला हव का तें ? "

" कजूष मारवाडी कुठले ! आपण हुडा द्यायला नको, अन् स्थळ मात्र पाहिजे थोरामोठ्याच अन् मुलगी तरी काय ध्यान लागून गेली होती ! घोडनवरी होऊन खिकाळत होती घरात ! काळच फिरला झाल ! आमच्या वेळीं एखाद्या आचाऱ्या–पाणक्याच्या गळयात बांधली असती, पण अशी नसती ठेवली धोंड उरावर ! "

तांबड्या अलवणाचा पदर डोक्यावर चोपून बसवीत, तांदुळाचा पेला सावरीत, दिवाकरावर मुक्ताफळें उधळून वाड्याच्या मालकीणबाई पुराणाला निघून गेल्या

बधिर हृदयाने दिवाकर घराकडे परतला. आत वैद्यबुवा आईला मात्रा उगाळून देत होते

त्याच रात्रीं पताकडून जरूरीची तार गेली आणि चुटक्याच्या माडवात तिसऱ्याच दिवशीं दिवाकराचे सुशीलेशीं लग्न उरकले.

" लक्ष्मीनारायणासारखी नांदा . " म्हणून आईनें वधूवराच्या तोंडात साखर घातली जहांबाज ससारातला शेवटचा विजय मिळवून आठव्या दिवशीं आईसाहेब परलोकीं गेल्या !

जगाच्या रहाटीप्रमाणे दिवाकराचा ससार सुरू झाला.

व्यावहारिक जगातला प्रेमभग नेहमीच काहीं दु:खातक नाटकातील नायकाप्रमाणें मृत्युला कवटाळीत नाहीं नाखुषीने घरात आणलेल्या सुनेनेंहि सान्या दुर्गुणाचा मक्ता घेतलेला नसतो.

लग्नानतर हळूहळू सुशिलेलाहि मागचा इतिहास कळला. तरीहि त्या उजाड अन् भगलेल्या पायावरच तिनें आपल्या ससाराचा इमला मोठ्या कष्टाने झटून उभारला.

कधीं कधीं मात्र सुरेखाच्या आठवणीनें दिवाकर बेचैन होई, त्या वेळीं सुशीला त्याला एकान्तात बसू देई तो आवेग ओसरल्यावर आपल्या प्रेमानें, आर्जवाने आणि चातुर्यानें त्याची मर्जी सभाळून ती त्याचे मन ओढून घेई.

शिवाय तोहि तरुण होताच

हळूहळू प्रेमभगाच्या जखमेवर खपली बसत चालली सुशीलेच्या कडेवर एक मूल खेळू लागलें आणि दिवाकरहि मागील दुर्लक्षाचा वचपा एकनिष्ठ पत्नीप्रेमाने भरून काढू लागला दूरवरच्या एका विद्यालयातली नोकरी सोडून तो नुकताच महाराष्ट्रातील एका विद्यालयात प्राध्यापक म्हणून आला होता इतक्या वर्षानतर वर्गात अकस्मात् सुरेखाचें दर्शन होऊन त्याच्या सार्‍या गतस्मृति जागृत झाल्या होत्या

  

“ च्या झालाय साब ! ” दार उघडून कॉलेजचा पट्टेवाला वर्दी देऊन गेला.

दिवाकराची तद्री भगली ! त्याची सिगारेट केव्हाच जळून गेली होती, आणि गतस्मृतीप्रमाणे त्याचे तोंडहि कडवट झालें होतें त्यानीं चूळ भरून टाकली आणि चहाच्या टेबलाभोंवती जमलेल्या अध्यापकाच्या घोळक्यात एक खुर्ची अडविली

सारे हास्याच्या पिचकार्‍यानीं विनोदाची रगपचमी साजरी करीत होते. त्याच्याबरोबर दिवाकरानाहि हस्तीदती करावी लागली.

दिवाकराचें घरीं येणें म्हणजे एक रोज एक बदलता विनोदाचा कार्यक्रम असे.

कधींकधीं अर्ध्या फर्लांगावरून वाजत येणार्‍या सायकलच्या घटेचा गजर त्याच्या आगमनाची वर्दी देई. कधीं अगदी चोरपावलानीं येऊन ते दारावर एकदम बोटाची टकूटक् फेर करीत किंवा कडीची खणखणीत

झगट वाजवीत. "कोण आहे? कोण आहे तें?" या आतल्या प्रश्नाना उत्तर न देता कडी उघडेपर्यंत ते सुशीलेचा अर्धा जीव करून सोडीत. कधीं खिशात आणलेले चाकोलेटचें पाकीट आपणाकडून सुशीलेकडे, तिच्याकडून आपणाकडे अशी फेकाफेक करून, छोट्या शरद्‌ला एका कडून दुसऱ्याकडे धावाधाव करावयास लावून ते थट्टेनें त्याला रडकुडीला आणीत

पण आज मागल्या दारानें घरात येऊन ते आपल्या पुस्तकाच्या खोलींत केव्हा गेले याची वार्ताहि सुशीलेला कळली नाहीं!

तापलेली काच हळूहळूच थड होऊ दिली पाहिजे हें शहाणपण सुशीला लग्नानतर आपोआप शिकली होती

ट्रेमध्ये चहा—फराळाचें ठेवून तिनें अतगृहाचा ठाव घेतला

मनस्ताप झाल्यास वाचावयाचीं म्हणून काहीं पुस्तकें दिवाकरानीं मुद्दाम बाजूला काढून ठेवलीं होतीं "माया॰वती" एडिशनमधील विवेकानदाच्या ग्रथाचा एक भाग काढून ते सध्याकाळपर्यंत वाचीत बसले होते मात्र त्यातला अर्थ त्याच्या मनात कितपत उतरला हा प्रश्न निराळा!

सूर्याची ताशीव कडा पश्चिम क्षितिजावर विसावली तेव्हा दिवाकर बाहेर पडले लावच्या टेकडीवर एका खडकाला पाठ देऊन ते गता युष्याचा विचार आणि पुढील भवितव्य याचे आडवे उभे धागे विणीत होते.

थोड्या वेळानें खडकामागून आरडाओरड, हास्यकल्लोळ आणि सिगारेटच्या धुराचे फवारे येऊ लागले कॉलेज विद्यार्थ्यांच्या गप्पाच्या फिरत्या क्लबचा ट्रेडमार्क होता हा! गावातले नवीन बोलपट, समेलनाच्या निवडणुकी, वर्गातल्या मुलामुलींचे मार्मिक विशेष वगैरे रुळाचे सांधे बदलत बदलत त्याच्या सभाषणाची गाडी अध्यापकाच्या टर्मिनस स्टेशनवर येऊन उभी राहिली. कॉलेजातील अनेक अध्यापकाचा मार्मिक शेलक्या शब्दानीं उद्धार झाला, तोहि त्याच्या साकेतिक नावानीं! आपल्याला विद्यार्थ्यांनीं कोणकोणतीं नावें दिलीं आहेत, आणि आपल्यावर ते कोण कोणती टीका करतात तें बहुतेक अध्यापकाना ठाऊक नसतें म्हणून ठीक.

अज्ञान हेंच सुख आहे असें कुणीसें म्हटलें आहेच, नाहीं?

त्यातच ' दिवटे ' या नावानें आपल्यापर्यंत हे कोण येऊन पोचलें हें दिवाकराना कळून आलें आडून ऐकणाराला नेहमी आपली निंदाच ऐकू येते हा जगाचा नियम आहे मध्येंच एका अदृश्य हातानें दुसऱ्याच्या पाठीवर एक थाप घुमविली आणि शब्द आले—

" वशा, भविष्य लिहून ठेव आजच! इतक्या दिवसाची तुझी तपश्चर्या आज विफल झाली आणि सुरेखा आजपासून तुला अतरली!"

" कोण म्हणतो अतरली? तीन वर्षे ओळख आहे आमची आठ दिवसापूर्वीच तिन परीक्षा आटोपल्यावर लग्न करायच वचन दिल आहे मला."

" बाबा, विसर ते सार आता! आजच्या या प्रो दिवट्याची माग ओळख होती तिच्याशीं! एवढ मात्र सागतों, कीं आता हे प्रकरण चागलच रगणार आणि आमचे वसतराव सफाई तोंडघशी पडणार!"

वसत एकदम उठून उभा राहिला होता खडकाआड लाबून त्याच्या टोपीची कडा मात्र दिवाकराना दिसत होती

थट्टामस्करीचे वातावरण गभीर आणि चिरडीचे होत चाललें होतें. तें पाहून एकानें विषय बदलला—

" अरे लेको! बी ए व्हायचे अजून तुम्ही, अन् मुलींच्या अन् लग्नाच्या कसल्या गोष्टी करता तुम्ही! एखादा म्हातारा धापा टाकीत आला या टेकडावर तर लाख शब्द सुनवील तुम्हाला या विषयावर!"

" हो, अन् आम्हीहि त्याला विचारूच की कॉलेजचा बी ए चा वर्ग तर राहोच, पण इग्रजी शाळेत असतानाच तुम्ही किती मुलाचे बाप झाला होता ते?"

नतरच्या हास्याचा ध्वनि मागे हेलावत होता आणि वाढत्या अधा रात त्याच्या छाया वितळून जात होत्या.

दिवाकर घरीं परतले ते पूर्वीपेक्षाहि अधिक उद्विग्नतेनें.

यापुढें दिवाकराच्या तासाला एक टवाळाची टोळी हटकून दगा करू लागली. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें तिचें नेतृत्व वसताकडेच होतें हें दिवाकरांच्या लक्षात आलें होतें. याबरोबर मुलींमध्येंहि कुजबूज होत गली.

सुरेखाच्या शेजारीं बाकावरहि कोणी दिसेना. एखादे वेळीं दिवाकर आणि सुरेखा हीं आकस्मिकपणे लायब्ररीनहि का होईना पण एकाच व्हराड्यातून जाताना दिसलीं कीं पुष्कळांचीं बोटें लवत आणि निरोगी विद्यार्थ्यांनाहि एकाएकीं खोकल्याची उबळ येई!

हा सारा प्रकार पाहून दिवाकराचा हळवा जीव माशासारखा तळमळे अनेक वर्षांपूर्वी आपण प्रेम केलेली मुलगी आता आपण अध्यापक असणाऱ्या कॉलेजमध्यें शिकत आहे हा आपला अपराध काय? हा प्रश्न त्याच्या मनाला टोंचीत असे त्या प्रसंगाला अनेक वर्षें लोटलीं होतीं त्याचें क्षम होऊन ते संसारालाहि लागले होते वर्गात दृष्टादृष्ट झाल्यावर गैर समज नको म्हणून त्यानीं सुरेखाची भेट घेण्याचाहि प्रयत्न केला नव्हता. तरीहि या कुत्सित टीकेचा ससेमिरा आपल्यामागें लागावा याचेंहि त्याना राहून राहून वाईट वाटत असे

त्यात एके दिवशीं तर कळसच झाला! मुद्दाम गैरसमज करून घेऊन एखाद्या सात्विक, शुद्ध पण जगात न निर्ढावलेल्या मनुष्याची पाय मल्ली करण्यास जग कसे तयार असतें याचा त्याना अत्यत कटु असा अनुभव यावयाचा होता.

सध्याकाळच्या वेळीं गावाबाहेरील दूरच्या नदीतीरीं एकट्यानेंच फिरावयास जाण्याचा दिवाकराचा शिरस्ता असे खिशात एखादी सुदर आवृत्तीची भगवद्गीता किंवा ' आकेंपिस ' चें ' इमिटेशिओ ख्रिस्ती ' असें एखादें तत्त्वज्ञानाचें पुस्तक घेऊन ते तीरावरील खडकावर पाण्यात पाय सोडून बसत. लहर लागल्यास वाचावे किंवा नदीच्या वाहत्या लाटावर आपल्या विचाराची होडी सोडून ती नजरेआड होईपर्यंत तिकडे पाहात बसावें असा त्याचा क्रम असे उशीर झाल्यानें ते झपझप पावलें टाकीत घराकडे परत चालले होते. गावाजवळ येणाऱ्या वाटेवर झाडाच्या छायेंतून एकाएकीं आवाज आला—

—" एकदा निसटल्यावर मग काहीं पळायला नको इतके!"

दिवाकर दचकले. त्यानीं बाजूला वळून पाहिलें. झाडाखालून पायवाटेनें सुरेखा वसतिगृहाकडे परत चालली होती. दिवाकर हसले. " अजून

अल्लडपणा गेला नाहीं तुझा ' सू ' ! " ते म्हणाले

" तर तर ! तुम्हीहि अगदी म्हातारेच झालात, नाहीं ? इतके दिवस झाले, साधी ओळख जाणून तरी कधीं दोन शद्ब बोलायचे होते तुम्ही ? पण आता तुम्ही झालात मोठे प्रोफेसर ! मग कशाला राहते आहे गरीब बापड्या सुरेखाची ओळख ! "

" सू ! थट्टा करायचा प्रसग नाहीं हा तुझ्या भोळ्या नी सरळ दृष्टीला सार जग सरळ दिसत मी सहज याव आणि बाळपणच्या ओळखीच्या आधारावर तुझ्याशीं मोकळेपणान बोलाव ही परवानगी देण्या इतक सरळ वृत्तीच हें जग नाहीं इतके दिवस मी तुला अगदीं टाळूनहि कुत्सित लोकाच्या जिभा सापासारख्या सळसळू लागल्या आहेत. दश करण्यासाठीं ते फक्त मान्याची जागा शोधीत आहेत एवढच "

—" म्हणजे ! मला नाहीं कळला याचा अर्थ ? साध बोलूहि नाही माणसानीं ! " सुरेखा गोंधळून म्हणाली

" इतक्यान नाहीं कळायचा तो अर्थ तुला ! " दिवाकर उत्तरले " त्यासाठीं बाहेरच्या जगात चार पावल टाकायला हवींत सुरेखा ! विद्यार्थ्याच्या राखीव अन् कृत्रिम जगातून बाहेर पडण्याबरोबर मी पहिला धडा शिकलों प्रत्येकाला तो केव्हातरी शिकावा लागतोच आणि तूहि तो आताच शिकलीस तर पुढचे पुष्कळ त्रासाचे प्रसग टळतील तो धडा हा—जगात वावरण आपल्याला प्रथम वाटत त्याच्या शभर पटीन कठीण असत. कॉलेजच जीवन म्हणजे फुलबागेतली सहल असली तर जगातील पायपीट म्हणजे बाभळीच्या काटेरी रानातून, किंवा निवडुगाच्या फडातून प्रवास करण्यासारखें आहे, सापाची वळवळतीं वारुळ तुडवून जाण्या सारखी आहे. कितीहि जपा, कुणाचा ना कुणाच्यातरी शेपटीवर ओझरता पाय पडणारच आणि मग असा प्राणी जो डूक धरील तो जन्माचाच— "

" अय्या ! अगदीच ' सिनिक ' ( तिरसट तत्त्वज्ञानी ) झालात कीं तुम्ही ! "

" झालों नाहीं, ' सू ' बनवल मला जगान "

" जाऊ देत बाई ही कटकट ! एकाएकीं त्या दिवशीं इतक्या

वर्षांनीं तुम्हाला पाहिल्यावर धक्काच बसला मला त्यापूर्वी वेळापत्रकावर तुमच आडनाव वाचल तेव्हा त्या नावाचे दुसरे कोणी तरी असतील अशी माझी समजूत झाली होती पण मीं तुम्हाला वर्गात ओळखल किती बदललात तुम्ही ! अन् आता तुम्ही मला पाजलेला तत्त्वज्ञानाचा डोस फिनई एखाद्या जगाला विटलेल्या म्हाताऱ्याला शोभेल, तरुणाला नव्हे ! बाकी तुमच्याइतकी मनाची तयारी झाल्यावर आता एखाद्याबद्दल काय आपलेपणा उरणार ते दिसतयच आता ! " सुरेखा जरा टोंचून म्हणाली.

" आणि वाटून तरी काय उपयोग आहे आता सू ! मला मनात काय वाटत तें एकट्या मलाच माहीत पण आता मन घट्ट करायला हव आयुष्यातला प्रेमाचा डाव एकदा हुकला म्हणजे पुढच्या जन्मापर्यंत त्याची वाट पाहात खेळाबाहेर बाजूला बसाव लागत देव म्हण, दैव म्हण, किंवा माजर उदराला खेळवत त्याप्रमाण सुखदु खाच्या चाळवण्या दाखवून, त्या असुरी खेळात आनद मानणारी एखादी अदृश्य शक्ति अस म्हण, पण तिन एकदा तुला नी मला निराळ करून ठेवल आहे एखाद्या स्टेशनावर अगदीं जवळून, पण विरुद्ध दिशेन जाणाऱ्या दोन आगगाड्या पाहिल्या आहेस का तू ! त्या गाड्यात, अगदीं समोरच्या खिडक्यात, फारा दिवसांनीं दृष्टीस पडलेल्या दोन व्यक्ति असाव्यात, पण क्षणाक्षणाला त्या दोन्ही गाड्या त्याना दूरदूर कुठतरी अज्ञातवासाकडे खेचून नेत असतात ! मग उगीच खिडकींतून ओणवून पुढ हात पसरण्यात काय अर्थ ! अगदीं अशीच आपली स्थिति झाली आहे ! आणि माझ्याबद्दल म्हणशील तर आता तरी प्रेमापेक्षा कर्तव्याची हाक मला ऐकली पाहिजे मीं एकदा घेतलेल्या या व्रताला कोणताहि मोह घातक आहे म्हणूनच मी तुला इतके दिवस टाळीत आलों एकदा विझलेली धुनी का उगीच पेटवा ! जाऊ दे ही माझी कर्मकटकट ! पण तू आता इतक्या वर्षांनीं—कशी कॉलेजात ! "

—" हः ! तुम्हाला काय वाटल, की ज्ञानाच्या तहानेन माझा घसा कोरडा पडला म्हणून मी या पाणपोईत आलें ? लग्नाच जमेना, घरीं मोकळी पाहून पाहून बाबाहि विटले, म्हणून अडकावून दिल मला

कॉलेजात नाहींतर मध्यें कितीतरी वर्षं खंड पडला होता माझ्या शिक्षणात ! मीहि कटाळले होते तुम्ही यायच्या आधीं आमच्या वर्गातल्याच वसत जोशी नावाच्या माझ्या ओळखीच्या विद्यार्थ्यान मला मागणी घातली होती, आणि मीं त्याला होकारहि दिला होता पण—आता मात्र माझ मन माग घेऊ लागल आहे पुन्हा !"

दिवाकराची अस्वस्थता वाढू लागली होती ते एकाएकीं म्हणाले, "किती उशीर झाला हा ! जाऊ या आता उद्या सकाळीं घरीं येशील का चहाला ? सुशीलेचीहि ओळख होईल तुझी किती अधार पडला आहे हा ! अशाच अधारातून आपल्याला जपून मार्ग काढावयाचा आहे हें लक्षात असू दे म्हणजे झाल "

जरा पुढें सुरेखाच्या वसतिगृहाची वाट फुटली होती दिवाकर आणि सुरेखा पाठ फिरवून विरुद्ध दिशेनें चाललीं होतीं

या सर्व सभाषणावर कुठूनशी टेहळणी होत होती हे दिवाकराना ठाऊक नव्हतें ते झपाझप पावले टाकीत जात असता प्रौढ विद्यार्थ्यांची एक टोळी अधारात त्याना मुद्दाम धक्का देऊन गेली त्याच्या ओळखीचा वसताचा आवाज मुद्दाम त्याना उद्देशून आला—

"छान अभिसार चालला होता बर का ! निशाभिसार की ज्योत्स्नाभिसार ? काय नाव द्यायच याला ?"

दिवाकर स्तभितच झाले सुरेखाशीं बोलण्यात आपली चूक तर झाली नाहीं, असें त्याच्या सशयी हळव्या मनाला—वाटू लागलें शुद्ध बुद्धीनें केलेल्या अगदीं साध्या गोष्टीचाहि विपर्यास किती भडक व घाणेरडा होऊ शकतो याची त्याना आता कल्पना आली त्यानीं हाक मारली, "जोशी ! जरा थाबा माझ काम आहे थोड तुमच्याशीं "

वसत जरा चपापला पण तेवढ्यात आपली बेफिकिरी दाखविण्यासाठीं त्यान निष्काळजी स्वरानें मित्राना निरोप दिला

"अहो ! अलभ्य लाभ ! आमचे प्रोफेसरसाहेब सभाषणाचा बहुमान देत आहेत आम्हाला. अच्छा, जा तुम्ही अन् हें पाहा बन्या, ताट पाठवायला साग खोलीवर माझ. गुड नाइट ह ! कशाला हाक मारलीत सर !"

" वसतराव ! ही 'सर' ची भाषा सोडून द्या थोडा वेळ विद्या-लयाच्या बाहेर विद्यार्थ्यांशीं मित्रत्वाच्याच नात्यान वागण्याची माझी पद्धत आहे बसू या इथच बाकावर थोडा वेळ थोड मोकळेपणान आणि सलगीन बोलू का मी तुमच्याशीं ?

वसत मुद्दाम बेफिकिरी दाखवीत म्हणाला—

" वा ! वा ! हें काय बोलण झाल ! अहो, वर्गात तासन् तास आम्ही तुमची पोपटपची नाहीं का ऐकून घेत ? मग आता काय हरकत आहे थोडा वेळ ऐकायला ! बोला खुशाल, कान तयार आहेत माझे " वसत सारखा कुचेष्टेच्या स्वरात बोलत होता

" हें पहा वसतराव ! इतर ठिकाणीं तुम्ही काहीहि बोलला असता तरी त्याचा खुलासा करण्याची कामगिरी माझ्यावर आली नसती. जगाच्या तोंडाला कोण हात देऊ शकणार ! पण या वेळीं जाताना तुम्ही मलाच खोंचून सवाल केलात तेव्हा त्याच उत्तर देण मला भाग आहे. वसतराव, तुम्ही बुद्धिवान आहात, उत्साही आहात, विद्यार्थ्यांत तुमच चागल वजन आहे आणि खरी परिस्थिति काय आहे तेंहि तुम्हाला कळून चुकलच आहे. पण तुमच्या या साऱ्या उत्साहाचा आणि कर्तब-गारीचा उपयोग आजच्या विद्यालयातली विस्कटलेली व्यवस्था नीट बस-विण्याकडे न करता, गैरसमजाच रान उठवून ती अधिकाधिक विस्कळित करण्याकडे तुमची का प्रवृत्ति होते ते सागाल का मला ? मी इथ आल्या-पासून तुम्ही माझ्याबद्दल बराचसा पद्धतशीर गैरसमज करण्यात भाग घेतला हें माहीत आहे मला. परतु त्याआधी मोकळेपणान मला येऊन भेटला असता, खऱ्याखोट्या मनातल्या शका फेडून घेतल्या असत्या तर तुमचे सशय किती फोल आणि निराधार आहेत हें तुम्हाला केव्हाच कळल असत " दिवाकर कळकळीनें म्हणाले.

वसत तिरस्कारानें म्हणाला,—

" कशाला यायच तुम्हाला भेटायला ? खर सागू सर ! युधि-ष्ठिराचा रथ म्हणे जमिनीच्या सपाटीवर, चार बोट अधांत्री चालत असे ! पण काहीं अध्यापक विद्यार्थ्यांच्या डोक्यावरून चार बोट वर अतराळीं

चालत असतात आम्ही होऊन आलों तर ' बसा ' म्हणायलाहि तुम्हाला कमीपणा वाटायचा ! मग कशाला तुमची अडचण करा उगीच ! जोंपर्यंत आपला काल्पनिक मोठेपणा सभाळण्यातच तुम्ही गर्क आहात तोंपर्यंत हे गैरसमज चालणारच सामान्य बोलणं आहे हं तुमच्याबद्दल काय कोणाबद्दलहि व्यक्तिशः बोलायचं नाहीं मला ही अहंवृत्ति आहे तोंपर्यंत काहीं मित्रत्वाच्या नात्याने वागणाऱ्या अध्यापकाचा मोकळपणाहि आम्हाला संशयास्पद वाटू लागतो एखादे वेळीं अशा दुधानं तोंड भाजल्यावर इतराच्या थंडगार ताकाच्या वाटेस जाण्याचीहि आमची इच्छा होत नाहीं. विद्यार्थ्यांसारखे विभूतिपूजक आणि भावनाशील कोणी नसतील, पण तशी विभूतिपूजा करण्यासारखं, आम्हाला आपलेपणा व अभिमान वाटण्यासारखे गुण तरी तुम्ही दाखविले पाहिजेत "

" वसंतराव ! सद्कार्यांची आणि मनमोकळपणाची जरूर आहे असं मी म्हणतो ते यासाठींच " दिवाकर उत्तरले. " स्वतःच्या अंगच्या सर्व सुप्त शक्तींचा पूर्ण वाढ करणं हं मी शिक्षणाचं ध्येय समजतों. त्यासाठीं या काळात असतील त्या सर्व सधींचा फायदा घेऊन तुम्हीं आपली प्रगति करून घेतली पाहिजे या ध्येयसिद्धीच्या मार्गात तुम्हाला मदत करण्यासाठीच तर आम्हीं इथं आहोत आता एका परमेश्वराखेरीज सर्वगुणपरिपूर्ण असा कोणीच नाहीं पण अध्यापकांत असतील त्या गुणांचा तरी शक्य तितका फायदा तुम्हीं करून घेतला पाहिजे "

" पण या साऱ्या वरवरच्या गोष्टी झाल्या तुमचं बोलणं ऐकून मला एका पक्ष्याची आठवण होते कोणी त्याच्या घरट्याजवळ जाऊं लागला, की पंख मोडल्याचं मिष करून तो पक्षी लंगडत, फरफटत हळू हळू दूर जातो त्याचा हेतु हा, की आपल्यामागं लागून पारध्यानं आपल्या घरट्याकडे दुर्लक्ष करावं तुम्हीहि मला अशाच रीतीनं भलत्या वादात ओढण्याचा प्रयत्न करीत आहात या तात्त्विक प्रश्नामुळं नव्हे, तर अगदीं दुसऱ्याच कारणामुळं तुमचं मन माझ्याविषयीं कलुषित झालं आहे आणि तुम्ही तें विष सर्वत्र पसरविण्याची खटपट करीत आहात. खरं आहे की नाही ? "

या सरळ प्रश्नानें गोंधळून वसंत जरा खाली पाहू लागला.

"हे पाहा, लाजण्याचं किंवा गोंधळण्याचं काही कारण नाहीं आता चारसहा महिन्यांनीं पदवी घेऊन तुम्ही प्रौढ नागरिक म्हणून जगात वावरणार शाळेतील पोर नाहीं तुम्ही दटावायला! अशा वेळीं अनुरूप सहचारिणी शोधून तुम्ही मार्गाला लागण्याचा विचार केलात तर त्यात मला तर वावग वाटणार नाहीं तुमच्या प्रेमाच्या मार्गात माझी अडचण आहे हा तुमचा गैरसमज अगदी चुकीचा आहे हें सांगण्या साठींच मी तुम्हाला इथ बोलावल आहे"

"खर म्हणता तुम्ही?" वसंत आश्चर्याने उठून उभा राहिला "तुम्ही मोकळेपणान आणि बरोबरीच्या नात्यान बोललात इतक कुणीं बोलल नव्हत माझ्याशीं तेव्हा मलाहि आता खर सांगाव लागत मीं तुमच्याविरुद्ध प्रचार केला हे खर आहे सुरेखावर अजूनहि माझ प्रेम आहे मीं तिला मागणी घातली होती, आणि तिन मला होकारही दिला होता पण लागलीच काय यक्षिणीची कांडी फिरली कोण जाणे! तुम्ही इकडे आल्यापासून तिची वृत्ति एकाएकी फिरल्यासारखी दिसू लागली आणि तिन एक चिठ्ठी पाठवूनच आपला पूर्वीचा बेत बदलल्याच मलाहि कळविल त्यानंतर आमची भेटसुद्धा नाहीं! मग या साऱ्या प्रकाराला तुमच येणं हेच कारण असं समजून मी चाललों यात माझी चूक झाली काय? बाकी तिच्या या आचरणात तुमच उत्तेजन किंवा फूस शोधून काढण्यासाठी मीं हरतऱ्हेन प्रयत्न केले, परंतु त्यात तुमच्याकडे प्रत्यक्ष असा कोणताहि भाग मला दिसून आला नाहीं इतकच नव्हे, तर तुम्ही आपण होऊन तिला टाळीतच होता हें पाहून मलाहि अलीकडे तुमच्याबद्दल आदर वाटू लागला आणि या बाबतींत आपण उगीच जमीन धोपटाई तर चालविली नाहीं, अशीहि शंका मला येऊ लागली होती हेहि मी सांगतों बर म्हणा, वाईट म्हणा, झाला हा प्रकार असा आहे प्रेमाच्या गुलाबाभोवताली मत्सराचे काटे असतातच आज तुमच सुरेखाशीं काय भाषण झाल याची मला कल्पना नव्हती, पण केवळ या भेटीनच चिडून जाऊन मी मघाचे शब्द बोललों."

"तुम्ही मित्रत्वाच्या नात्यानं खुलासा करून मला आश्वासन दिलंत त्याचाच फायदा घेऊन का होईना, मीहि एक विनति करूं का तुम्हाला? सुरेखाबद्दल तुमच्या मनात आता कोणताहि प्रेमपाश उरला नाहीं हें तुम्ही सरळपणें मला सांगितलं त्याबद्दल मी संशय घेत नाहीं. मात्र तुम्ही इथं आला नसतां तर सुरेखाच्या होकाराचा नकार झाला नसता ही वेडी आशा अजून माझ्या मनाला सोडीत नाहीं. तिच्यामुळंच मला वाटतं, कीं निदान तुम्ही तिला माझ्याबद्दल दोन गोष्टी सांगितल्यास ती तुमचा शब्द खालीं पडूं देणार नाहीं. तुमच्या नुसत्या येण्यामुळं अन् दर्शनामुळं जर होकाराचा नकार होऊं शकतो, तर तुमच्या प्रत्यक्ष सांगण्यावरून त्या नकाराचा होकार का होऊं नये?"

"अहेतुकपणें का होईना तुमच्या येण्यामुळं हें सारं वादळ उठलं आणि तें शमवायचं असलं तर ते तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाला शमविता येणार नाहीं. सुरेखाबद्दलचे तुमचे हेतु आणि विचार कितपत शुद्ध नी निःस्वार्थी आहेत हे पडताळून पाहाण्याची तुम्हालाहि ही एक चांगली संधि मिळेल"

"फार चमत्कारिक विनति आहे ही वसंतराव!" दिवाकर उत्तरले. "नोकरी—अर्जाप्रमाणं प्रेमाच्या अर्जासाठीं काहीं प्रोफेसराच्या शिफारशीचा उपयोग होत नाही बरं का! पण या तुमच्या मार्मिक मागणीच्या मागील तुमचा अस्फुट हेतु माझ्या लक्षात आला आहे, म्हणूनच मी ती स्वीकारतों उद्यां सकाळीं चहालाच या माझ्या बंगल्यावर म्हणजे आपण पुढच्या गोष्टी बोलूं. बरीच रात्र झाली, नाहीं? अच्छा! गुड नाइट्!"

   

अनेक वर्षें शांत आणि निद्रिस्त असलेला दिवाकराच्या मनाचा ज्वालामुखी एकाएकी जागृत झालेला पाहून बिचारी सुशीला मात्र फार गोंधळून गेली होती. नेहमी 'समदुःखसुख' अशे 'स्थितप्रज्ञ' सारखे दिसणारे दिवाकर इतके अस्वस्थ का व्हावे याचें कारण समजण्यासाठीं

तिनें आपल्यापरीनें अनेक उपाय करून पाहिले दिवाकराच्या तोंडून कधींहि कठोर शद्ब आला नाही. तथापि या प्रकरणाचा सुशीलेला पटेल असा खुलासा करण्याच्याहि मन.स्थितींत ते नव्हते. एखाद्या मजबूत कुलपाशीं एकामागून एक किल्लया लावत आपण आशेने बसावें, पण तें काही केल्या उघडूच नये अशी सुशीलेची स्थिति झाली होती आणि तिच्या थोड्या ताठर वृत्तीमुळें अगदीं सरळ निर्वाणीचा प्रश्न टाकून सोक्ष मोक्ष करण्याचीहि तिची तयारी नव्हती

त्या रात्रीं दिवाकराच्या बगल्यात अत्यत उदासीन असें वातावरण होतें. भिंतीवरच्या घड्याळाचे टकटक असे ठोके पडत होते आणि त्याला साथ म्हणून दिवाकराच्या खोलींतल्या फरशीवर त्याच्या स्लिपर्सचा टकटक असा आवाज रात्रीं तीन वाजेपर्यंत चालला होता छोट्या शरद्ला पोटाशीं घेऊन तो आवाज ऐकत असताच बऱ्याच वेळानतर सुशीलेला झोप लागली

सकाळीं मात्र दिवाकरानीं आनद आणि उत्साह अगदीं ओढून आणल्यासारखा दिसत होता सुशीला जागी झाली ती त्याच्या न्हाणी घरातल्या स्नानाबरोबरीला गाण्याच्या आवाजाने बादल्यातून पाणी घेताना होणारे बुडबुड असे आवाज, अगावरून फरशीवर पडताना होणारा पाण्याचा खळखळाट, स्नान झाल्यावर दूर लोटलेल्या भाड्याचा खणखणाट यातून त्याच्या आवडत्या गाण्याचे सूर बद दारा बाहेर हेलावत होते—

सुखके, दुखके, अब दिन बीतत नाहीं।
सुखके दिनका एक सपन था
अब दिन बीतत नाहीं ॥

सुशीलेनें घाईनें उठून केस सावरले आणि इतका उशीर झाला म्हणून जरा ओशाळून, चूळ भरून तिनें स्टोह पेटविला. न्हाणीघराचे दार उघडून दिवाकर बाहेर पडले आणि सुशीला त्याच्याकडे पहातच राहिली. चष्मा काढल्यानें आधींच खोल दिसणारे त्याचे डोळे जरा लाल-सर दिसत होते. कपाळाच्या मध्यभागीं एक शीर तटतटून उभी होती. नेहमीं अस्पष्ट, अन् हसताना मात्र दिसणाऱ्या गालावर तिरप्या उतर-

लेल्या दोन सुरकुत्याच्या रेषा आता ठळक दिसत होत्या त्याची चमत्कारिक चर्या पाहून सुशिलेला कसेंसेच झालें.

टॉवेलने कस कोरडे करीत ते म्हणाले, "चहाला पाहुणे येणार आहेत बर का! आज सुरेखाशीं ओळख करून देणार आहे तुझी माझ्यावर नेहेमी भडिमार करतेस ते सारे प्रश्न आता तिलाच विचार म्हणजे झाल"

सुरखाचे नाव ऐकून सुशीलेच्या कपाळावर एक आठी चढली. तेवढ्यात सहजपणे तिने मान वेळून, ओंठ जरा वाकडे करून स्त्रियाची नापसतीची ठराविक हालचाल केली हें दिवाकराच्या नजरेतून सुटले नाहीं.

"वाईट नको इतक वाटायला! कदाचित् या घरातला तिचा हा पहिला अन् शेवटलाच चहा असेल"

त्याच्या आवाजात जरा कप उत्पन्न झाला आणि ते चटकन् बाहेरच्या खोलींत गले

आठाच्या सुमारास सुरेखा आल्यावर दिवाकरानीं तिची सुशीलेशीं ओळख करून दिली त्याचा छोटा ब्लॉक, बाग, सुशीलेने भरलेले मखमली वरचे हस आणि ससे, फोटोफ्रेमी वगैरे पहात ते आतल्या खोलीपर्यंत आले ती हे सारें पाहात असता सुरेखाच्या मनात कोणते विचार चालले होत कुणास ठाऊक? दिवाकराच्या बोलण्याला मात्र ती नुसतें हू हू करून उत्तर देत होती

"चहा झाल्यावर तूच बाहेर घेऊन ये तुझ्या वर्गातले विद्यार्थी येणार आहेत थोड्या वेळान तोंवर चालू दे नव्या मैत्रिणीशीं हितगुज."

दिवाकर बाहेर टेबलापाशीं बसतात तोंच बाहेर सायकलची घटा वाजली

"या वसतराव, वाटच पाहात होतों आम्ही तुमची"

"आम्ही!"

"हो, आम्ही कळेलच तुम्हाला आता सार"

"हें पहा, चहा येऊ द्या झाला असला तर." दिवाकरानीं अतर्गृहाला मोठ्यानें सूचना दिली.

दारातला काचेच्या मण्याचा पडदा कणकण आवाज करीत बाजूला झाला चहाचा ट्रे घेऊन सुरेखा बाहेर आली

तिच्याकडे पाहून वसताच्या डोळ्यात पुन्हा असूयेची छटा चमकली.

" सुरेखा ! अन् इथ ? "

" होय मींच बोलावल होत तिला चहाला काल दिलेल वचन पार पाडण्यासाठीं तुम्हालाहि त्याच वळीं बोलावल आहे बैस सुरेखा, सकोच नको आता मी इथ येण्यापूर्वीपासूनच वसतराव चागल्या तुझ्या ओळखीच आहेतच चहा घेऊ या आधी "

थोडा वळ कपबशाशिवाय कोणीच आवाज काढला नाहीं कप खालीं ठेवून दिवाकर सुरेखाकडे वळले—

" हे बघ सू, पत्त खळताना एखाद पान टाकाव अन् तें चटकन् उचलून त्या जागी मागून दुसर । टाकाव अशा तऱ्हन वसतरावाच्या मागणीला एकदा होकार देऊन तू लागलींच नकार दिलास, अशी तक्रार ते मजजवळ करीत होते त्याचीं कारण काहींहि असोत, त्याच्या वतीन पाहिजे तर मी तुला विनति करतों, कीं तू त्याची मागणी स्वीकारावी. वसतराव बुद्धिमान् आहेत, कतृत्ववान आहेत, आता चार महिन्यानतर पदवी घऊन जगात नाव काढतील ते त्याच्याबद्दल मला फार आशा वाटते आमच्या सारख्याच जग म्हणजे कॉलेजच्या चार भिंतींत सामावलेल फार तर तोडपाटिलकी आणि लेखनकामाठीं यापलीकडे इच्छा असली तरी आम्हाला पाऊल टाकता येत नाहीं पख कापलेल्या पक्ष्यासारखी आमची एक जागची चिवचिव वसतरावाना मात्र त्याच्या उत्साहाच्या नी कर्तृत्वाच्या पखावर विशाल भराऱ्या मारता येतील. तुम्ही एकमेकाना सहाय्य करून जोडीन देशाच्या कल्याणाच कार्य करू शकाल अशी मला खात्री वाटते निदान त्यासाठीं तरी तू त्याच्या मागणीला समति द्यावीस. "

सुरेखा नुसती हसली एकाद्या पातळ फळींतून लवचिकशी करवत करकरत कापीत जावी तसें तिचें हसणें होतें

" प्रोफेसराऐवजीं वकील व्हायला पाहिजे होत तुम्हीं दिवाकर ! "

ती म्हणाली—" पण मी विचारतें, की तुम्ही मला काय एखादी बाहुली समजलात, कीं जुन्या काळची गुडघ्यात मान घालून बसणारी पोर समजलात, की इतक्या आत्मविश्वासान हें लग्न ठरवण्याची ही यातायात करायला लागलात तुम्ही ? वसतरावाशीं मला लग्न करायच असल तर तुमची शिफारस नको मला, अन् करायच नसलच तर कोणत्याही वकिलीचा माझ्यापुढ उपयोग होणार नाहीं जाऊ द्या जरा कठोर बोलून गेलें मी. माफ करा. काहीं गोष्टी स्वत करू म्हटल तरी हातान होत नाहींत त्यातलीच ही एक गोष्ट समजा. माझ तुमच्यावर प्रेम होत हें सागण्याची मला लाज वाटत नाहीं. पण आपल्या ताटातुटीच्या जखमेवर अनेक वर्षांनीं साहजिकपणें विस्मृतीची खपली बसली होती आणि त्या काळात मींहि अगतिक होऊन त्याना तो निर्जिव होकार दिला होता. दैवयोगान तुम्ही येऊन ती जखम पुन्हा सलू लागली आहे तुम्हीं काल मला सागितल त्याप्रमाण धर्माची आणि आपल्या समाजाची आडकाठी नसली तरी तुमच कर्तव्य आणि ध्येयसेवेच पावित्र्य यामुळ ते प्रेम सफल होण शक्य नाहीं तेंहि मला समजल आहेच आणि त्याचा परिणाम सहन करण्याची माझ्या मनाची मी तयारी करीत आहे या मधल्या अनेक वर्षांच्या काळात तुमच्याप्रमाणच माझहि लग्न होऊन मग ही आपली भेट झाली असती तर मला इतका धक्का बसलाहि नसता आणि तुमचा विचारहि कर्तव्यबुद्धीन मीं मनातून काढून टाकला असता. पण आज आहे ह्याच परिस्थितींत वसतरावाशीं लग्न करून मी त्याची प्रतारणा करू इच्छित नाही."

—" वसतराव, तुम्हालाहि कॉलेजमध्यें माझा स्वभाव माहीत झाला आहे लोक मला बोलभाड म्हणतात, फटकळ म्हणतात. स्पष्ट बोलण हा माझा दुर्गुणच आहे म्हणाना. तुमची मागणी आणि दिवाकराचीं शिफारस यामुळ जरी मीं या लग्नाला समती दिली तरी त्या ससारात आपली दिलजमाई कधीच व्हायची नाहीं. ससार नव्हे ससाराच विडबन होईल तें. मग उगीच हा हट्ट कशाला ?

जाऊ द्या. मघाशीं दिवाकर कर्तव्याबद्दल म्हणाले. मी म्हणतें एका दृष्टीन हे मायापाश तुटल्यान ती वाट तरी मोकळी झाली. मग

पुन्हा तेच तुटके धागे बळेंच गुडाळून घेण्यात तरी काय अर्थ आहे ! तुमच्याइतकी कर्तृत्वशक्ति नसली तरी माझ्या एकट्यान होईल तेवढ कार्य मीहि करीन अस म्हणते

बाकी दिवाकर, हा खरा प्रकार पाहून तुमच्यासारख्या स्थितप्रज्ञ ऋषीला अगदीं आनदच होत असेल नाहीं ? "

येथपर्यंत सारें धीरानें आणि निश्चयानें सागून शेवटीं मात्र सुरेखाच्या भावनेनें उचल खाल्ली आणि तिनें जरा फणकाऱ्यानेंच हा शद्वाचा घाव घातला दिवाकरानीं जड आवाजानें पण नेहमींच्या तात्विक, रुक्षपद्धतीनें उत्तर दिलें—

" होय ! आनद नसला तरी मीहि कर्तव्यपालनाच समाधान भोगतों आहे अध्यापकाचा पेशा म्हणजे सतीच वाण आहे त्याला वैयक्तिक परिस्थितीचे अपवाद मजूर नाहींत एकदा या अपवादाच्या पळवाटा शोधू लागलें म्हणजे सारे नियमच कवडीमोल होतात. त्यापेक्षा या कठोर नियमामुळ एखाद्याला झालेल दुःखहि त्यान समष्टीच्या हिताकडे पाहून शातपणे सोसायला हव इतर व्यवसायातल्या आपद्धर्माच्या सवलतींचा फायदा, ध्येयवादी म्हणून जगात मानान मिरविणाऱ्यानीं घेता कामा नये परिस्थिति कशीहि असो. "

वसत आणि सुरेखाचेहि डोळे भारावले होते ते सर्वजण उठले. इतक्या दिवसात पहिल्यानेच वसताने दिवाकराना वाकून नमस्कार केला.

" येतों सर क्षमा करा मला तुमची तपस्या आणि ध्येयवाद याची मला आधी कल्पना असती तर तुम्हाला त्रास देण्याच पाप माझ्या हातून झाल नसत. यापुढ मात्र जन्मभर मला तुमच्या चारित्र्याचा ध्येयवाद म्हणून उपयोग होईल.

" अच्छा सुरेखाबाई ! तुमची मर्जी ! माझ्याकडून मी अगदीं सरळ अन् शुद्ध रीतीनच वागलों आहे तुमच्या कार्याकडे अभिमानान पाहात राहीन मी. "

दिवाकर हळूहळू खिडकीशीं आले.

बागेच्या दरवाजातून वसंत आणि सुरेखा विरुद्ध दिशाना फुटणाऱ्या वाटेनें चालली होतीं वाढत्या गर्दीत तीं अदृश्य झालीं. दिवाकराच्या डोक्यात मात्र अजून विचाराचीं चक्रे भिरभिरत होतीं रुळावरून आगगाडीचीं चाकें घडघडत जात असलीं म्हणजे त्यातून काहींतरी तालबद्ध शब्द बाहेर पडत आहेत असे ऐकणाऱ्याला वाटतें दिवाकराच्या डोक्यातहि तशाच तालावर फक्त दोन शब्द घुमत होते—

" सतीच वाण ! सतीच वाण !! "



७ :

# कलावंत?

excellent

—" यावें–यावें, बुवासाहेब! इतक्या सकाळीं इकडे कुठे वाट चुकलात? अहो, यावेळीं तर तुमच्या गायनसमाजात भैरव– भैरवींच ताडवनृत्य सुरू असायच, सदारग–अदारगाच्या चढाओढी रगायच्या!"

—हॅ–हॅ–बुवा खाकरत म्हणाले—" ते तर रोजचच चाललय् वकीलसाहेब, पण आता गुरुकृपेनें हळूहळू आमचे शागीर्दही तयार होता–हेत–ते सभाळतात किरकोळ काम, त्यान फुरसद सापडते कधीं कधीं अशी. सकाळखेरीज वकीलसाहेबाची फुरसदीनें भेट व्हायची नाहीं म्हणून मुद्दाम आलों आहे आता आपल्याकडे."

रुमाल काढून ठेवून, कोटाच्या गुड्याशीं सहज खेळत बुवासाहेब जरा हलक्या स्वरात म्हणाले—" आज जरा खास काम आहे बर का! उद्या रात्रीं लखनौचे बदाहुसेनखाच गाण आहे आपल्या 'राधा विलास' गायनसमाजात तेव्हा म्हटल, आमच्या वसतरावजीसारखे जाणते सगित-रसिक श्रोते अवश्य यायला पाहिजेत—त्याशिवाय रग भरायचा नाहीं बैठकीला–अन् कशी बैठक–वकीलसाहेब! अगदीं खाशी बर का! उगीच बाजारबुणगे फुकटे श्रोते आणून रग बिघडवायचा नाहीं आम्हाला—अगदी थोडे, पण जाणते श्रोते हवेत–तेव्हा म्हटल . आपण . अवश्य .."

या खास आमंत्रणानें, आणि जाणतेपणाच्या सर्टिफिकीटानें वसंत-रावाना मनातून आनंद झाला खरा, पण तो चेहऱ्यावर न दिसू देता, जरा आढेवेढे घेत ते म्हणाले–ते खरं हो, पण मला सवड होईल कीं नाहीं तें सांगता येत नाहीं सकाळ नाहीं, संध्याकाळ नाहीं, रात्र नाहीं, तिन्ही त्रिकाळ हे आडमुठे पक्षकार केव्हा येऊन डोकं धरून बसतील त्याचा नेम नाहीं प्रत्येकाला आपला खटला म्हणजे जगातला सर्वांत महत्त्वाचा वाटतो—जसं काय प्रिव्हिकौन्सिल पुढंच अपील्च प्रत्येकाला वाटतं एकदा याच्या वकीलपत्रावर सही करून उपकार केले कीं त्यानं रात्रंदिवस आपलं एकट्याचंच 'ब्रीफ्' घेऊन, विचार करीत, डावपेच योजीत बसावं—बरं, जराही निष्काळजीपणा दाखवायची सोय उरली नाहीं आता—जरा ताणलें कीं कागद उचलून चालले दुसऱ्या वकीलाकडे–आमच्या आळींतच पहा, सतरा वकीलाच्या पाट्या लोंबताहेत"

बुवासाहेबानीं वसंतरावाचा नूर ओळखला होताच गाण्याप्रमाणें बोलण्यातही गोडवा लागतो हें तत्त्व त्यानीं केव्हाच हेरून ठेवलें होतें. त्याच्या उपासनेमुळेच आज 'राधाविलास' समाजाचा डमला उभा होता.

बाकी वसंतरावाना इतक्या आग्रहानें पुन्हा पुन्हा आमंत्रण देण्याचा आतला हेतु निराळाच होता

उपरणें सावरून, वसंतरावाजवळ सरकून ते खाकरत म्हणाले—"जाऊ द्या हो, वकीलसाहेब तुमची कामं सदार्चीच आहेत, पण अष्टौप्रहर चक्की जुपल्यासारखं राबून कसं चालेल? विश्राति पाहिजेच कीं—आमच्या संगीतासारखी विश्राति अन् विरंगुळा नाहीं—अहाहा!—नादब्रह्म आहे बर का! उगीच नाहीं! बैठकीनंतर दुप्पट ताजतवानं न वाटलं तर पुन्हा नाव काढू नका माझं. अन् असं पहा, आपल्या-सारख्या सुशिक्षितानीं आज आमच्या गायनकलेकडे लक्ष पुरवायाला सुरु-वात केली आहे म्हणून तर तिला उर्जितावस्था येतेय्–यानंच तर आज गल्लो गल्लीला गायनसमाज स्थापन होताहेत अन् इतक्या सुशिक्षित स्त्रियाऽ—मुलीऽऽ तरबेज होताहेत गाण्यांत......"

'स्त्रिया–मुली' घोळून म्हणताना बुवानीं खाकरून दूरच्या तस्तात नेमकी पिचकारी मारली. वकीलसाहेबाची घड्याळाकडची नजर ओळखून, उपरणें सावरून ते उठलेच—'बर तर, मग ठरलं—उद्या आपण दहा वाजता अवश्य यायच—अन् . अन् आपल्या विमलाताईना आठ–नऊ वाजताच पाठवून द्या. म्हणजे स्त्रियाच्या, मुलींच्या बैठकीची व्यवस्था पहायला ठीक अहो तिच्यावर तर माझी सारी मदार आहे...!' जिन्याकडे वळताना बुवा जरा स्वर उचावून, आतल्या खोलींत चोरटी नजर टाकीत म्हणाले—'कुठें गेली विमल ?—का आज आतल्या आतच बुवा ?—कालची झिंझोटींतली ठुंबरी बसली का ठीक ? "पिया बिन नाहीं आवत चैन" ह ! "ना ऽ ऽ हीं" वरची मींड आज बरोबर उतरली पाहिजे बर का मेहनतीच्या वेळेला . आहेस कुठें, एका वर्षात तुला अशी तयार करतों बघ !"

—"इश्श, तुमच काहींतरीच !" म्हणून विमल जरा फण-काऱ्यानेंच आतल्या खोलींतून निघून गेली.

जिना उतरताना खाकरत, उपरण्याने ओंठ पुशीत, बुवा लाघवी आवाजात, वसतरावाच्या कानाशीं लागून बोलत होते—"हें पहा वसतराव ! माझ्या विद्यार्थ्यांची मी कधींच स्तुति करीत नाहीं–कोणालाहि चागल, उत्तम म्हणायच नाहीं—फार तर ठीक म्हणाव, अशी आमच्या गुरूची आज्ञाच आहे. पण फक्त आपल्यालाच खाजगी म्हणून सागतों, कीं आपल्या विमलसारखी चलाख मुलगी मी कितीक वर्षांत पाहिली नाहीं .. म्हटल वडिलाकडूनच बुद्धि आणलेली दिसते पोरीनें .."

वसतरावाच्या खुललेल्या चेहऱ्यावरून, आपली गोळी बरोबर लागू पडली हें बुवानीं ओळखलें–मग जरा अघळपघळपणें ते बोलू लागले. —"अहो गेल्या चार महिन्यातच तिची इतकी प्रगति झालीय् कीं अपेक्षेच्या बाहेर अशीच चालू राहिली तर वर्षाच्या आत नाव व्हायला लागेल तिच आजूबाजूला ! 'नई जोबनवालीका मजा लूटा,' 'जरा सोने दे बालमुवा जगी सारी रात' 'पिया कर घर देखो बरकत है मोरी कलीया' असल्या अवघड चीजा देखील ती इतक्या सफाइनें अन् रगून म्हणते कीं

चार वर्षं तम्बोरा घासणाऱ्या, अन् तबला बडविणाऱ्या माझ्या शागिर्दांनाही नाहीं तशा म्हणता यायच्या—हूऽऽ ! उगीच नाहीं !—बर नमस्कार उद्या रात्रीं अगदीं ‘ टेन् शार्प ’ बर का ”

आपण बदलत्या काळाबरोबर आहोंत हे दोन इंग्रजी शब्दानीं दाखवून, उपरणे सावरीत बुवा निघून गेले रस्त्यातून डुलत डुलत जाणाऱ्या त्याच्या काळया लठ्ठ मूर्तीकडे कोणी पाहिलें असते तर त्याच्या स्फुरणाऱ्या नाकपुड्यावरून, आणि हलणाऱ्या ओंठाच्या कोंपऱ्यावरून त्याना कसला तरी खूपसा आनद झाला असावा अशी त्याची ठाम कल्पना झाली असती

  

दुपारीं जेवणाच्या वेळीं या आमत्रणाचा उल्लेख झाला ती गोष्ट ऐकून वसतरावाच्या पत्नीच्या कपाळाला एकदम आठ्या चढल्या हाता-तली पळी आदळून त्या एकदम उसळल्या— ‘ पण मी म्हणत्यें सदाची तरण्याताठ्या पोरीला त्या मोठ्या पुरुषाच्या घोळक्यात गाण शिकायला पाठवायच अडलय तरी काय ? काळ नाहीं, वेळ नाहीं—सदान् कदाचा मेला गायन समाज— गायन समाज ! रात्रीं आठावर नऊ वाजता पोर घरीं येते, अन् इकडे त्याच कधीं काहींच वाटत नाहीं गाण शिकू नाहीं अस नाहीं म्हणत मी—बरीक त्या मास्तरला घरीं तरी बोलवाव शिकवा यला ! बर ज्या समाजात पाठविलीन् तिथलीं शिकविणारीं माणस तरी कुलीन, अब्रूदार, बायकामुल असलेलीं आहेत कीं नाहीं याची तरी कधी चौकशी करायची झाली होती का ? अजून माझ्या विमलच लग्न व्हायचय् म्हटल ! ”

—‘मग तुझ म्हणण तरी काय आहे ?’ जरा त्रासून वसतराव म्हणाले. हे सारे गायनशिक्षक एकजात मवाली आहेत अस म्हणण आहे का तुझ ?’

—तस कधीं म्हटलय मी—अन् म्हणेन तरी कशी ?—जस आपल इतर शिक्षण—इतर शाळा तस हें गाण—अन् गायनशाळा इतपत कळत मला. शाळेबद्दल, त्यातल्या मास्तराबद्दल, आचार विचार, वागणुकी-

बद्दल आपण किती खोदून खोदून चौकशा करतों तेव्हाच पोरीबाळींना विश्वासान स्वाधीन करतों ना त्याच्या? मग अस काहीं केलय् तुम्ही या अशा शाळेबद्दल? कुणाहि कुलीन, घरदाज, वयस्क, जबाबदार माणसाच्या गायनशाळेत खुशाल जाउ देत माझ्या विमाला नाहीं म्हटल तर कान धरा माझा पण कालच देवळात शेजारच्या यशदाबाई भेटल्या होत्या. कुकू लावताना मला म्हणत होत्या कशावरनस, कीं आपल्या आळींतल्या या गायनसमाजाचा बुवा म्हणे दोन वर्षामागें एका हाटेलात नोकर होता ना घर, ना दार, ना आईबापाचा पत्ता त्या हाटेलातन काहीं भानगड करून पळाला अन् कुठे तरी गायनशाळेत हमाली करून, आ–उ करून, आता मोरे बुवासाहेब बनलाय् शेमला बाधून आपल्यासारखे चार चगीभगी चेले गोळा करून इथ गायनसमाज काढून बसलाय्-असल्या नवख्या, आगापिच्छा नसलेल्या पुरुषाच्या घोळक्यात तरण्याताठ्या पोरीला रात्रीं बेरात्रीं पाठवायच मला नाहीं पसत ”

पत्नीच्या सात्त्विक सतापापुढें वसतरावासारख्या फर्ड्या वकीलालाही नमतें घ्यावे लागलें अगावर येणाऱ्या बाजूतून निसटून जाण्याचे दोन मुख्य वकिली डावपेच त्याना अवगत होते एक म्हणजे अकाडताडव करून, डोक्यात राख घालून, प्रतिपक्ष्याच्या एखाद्या कमकुवत क्षुल्लक मुद्यावर भर देऊन, मूळ प्रतिकूल मुद्याला बगल देणें — दुसरे म्हणजे सारेंच थट्टेवारी नेऊन, जणू काय आपलाच जय झाला असें दाखविणें यावेळीं वसतरावानीं रागरग ओळखून दुसरा मार्गच स्वीकारला

—‘अरे वा! अशिक्षित, म्हणता म्हणता तू तर भगिनीसमाजातल्या कार्यकर्तीप्रमाणें व्याख्यानच द्यायला लागलीस कीं! पण आमची विमा तिच्या आईसारखी भित्री अन् घरबशी नाहीं चागली फाडफाड् इग्रजी बोलणारी, भाषण करणारी आहे ती कोणी काही गडबड केलीच तर अशा चार बुवाना वाटेला लावील ती, तुला काळजी नको तिची ’ म्हणून ते आचवायला उठलेच

❂ ❂ ❂

राधाविलास गायनसमाजाचे मालक आणि चालक चागले गायक

समजले जात असत—परतु आपल्या गाण्याची झाकली मूठ ते जाहीरपणें कधींच उघडीत नसत  दर गुरुवारी रात्रीं समाजात गाणें होई  तेव्हा 'वस्ताद' म्हणून प्रथम आपण 'कल्याण' रागातील ठराविक 'ख्याल' पाच दहा मिनिटें आळवून ते उठून जात आणि नतर सर्व बैठकभर त्याच्या शागीर्दानाच मेहनत करण्याची संधि देत  पण त्याच्या एकट्या-वरच सारा 'समाज' कसा चालणार ? गायन, पेटी, सतार, दिलरुबा वगैरेचे निरनिराळे वर्ग काढून त्यानीं आपल्या मित्राना आणि मर्जीतल्या शागीर्दांना त्यावर मास्तर म्हणन नेमून दिले होते  कित्येक आबटशौकी, हौशी जवान तर केवळ विद्यार्थिनींना शिकवायला मिळते एवढ्यावरच खूष होऊन विना–वतन काम करायलाही पुढे झाले होते मग शिक्षकाना तोटा कुठला ?

बुवाच्या गायनसमाजात सर्व दिवसभर रीघ लागलेली असे मिठ्ठास भाषण, हसरी मुद्रा आणि धूर्त वागणूक यामुळें बुवानीं चागलाच जम बसविला होता  त्याचे विद्यार्थी दारातून आत जाताना त्याच्याशीं थट्टेचा शद्ब बोलून आणि पाठीवरून हात फिरवून, 'वा ! वा !' म्हटल्या शिवाय ते त्याना आत जाउ देत नसत—विशेषत प्रौढ विद्यार्थिनींना! एकादीला या लघळपणाचा राग आलाच तर तिच्या प्रगतीची लागलीच तोंडभर स्तुति करून ते तिच्या गालावर पुन्हा हसू खुलवीत

सकाळीं लहान मुलामुलींचे सामुदायिक गायनाचे वर्ग, प्रौढ विद्या-र्थ्यांची मेहनत, सध्याकाळीं निरनिराळ्या वाद्याचे वर्ग आणि रात्रीं पुन्हा विशेष तयारीच्या शिष्याच्या गाण्याचे वर्ग या साऱ्यात पुन्हा स्पेशल क्लास असत—ते दुपारीं

घरोघर जेवणें होऊन पुरुषमडळी कामावर गेली म्हणजे प्रौढ स्त्रिया साठीं स्पेशल दुपारचे क्लास सुरू होत. बुवाचे आणि त्याच्या शार्गीदांचे इतर वेळीं कटाळलेले चेहरे यावेळीं मात्र खूप खुलत  काहींतर यावेळेसाठीं मुद्दाम जामानिमा करून, रगरगोटी करून येत—

—'ह ! सरलाबाई, 'नि सा गमप, गमप, गमप नीसां'! 'भीमपलासा'

ची ही सुरावट कितीदा सागितली हो तुम्हाला ! आमच "इतक सागण" ही अजून तुमच्या लक्ष्यात येत नाहीं, मग आता याहून स्पष्ट काय बोलायच माणसान ?—" अहो 'प'–'ध' नव्हे "—म्हणून एका पट्टीवरचें त्याचें बोट धरून तें दुसऱ्या पट्टीवर आणून ठेवीत .

—भीमपलासाची एवढी 'पक्कड' ही लक्षात येत नाहीं तुमच्या, मग आम्ही शिकवणार तरी काय, आणि तुम्ही शिकणार तरी काय ?

ही 'पक्कड' मात्र सरलाबाईंच्या बरीच ध्यानात आली असावी असें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें

आतल्या खोलींत दुसरे शागीर्द तरलाबाईंना गाणें शिकवीत होते. आज त्याचा नवा 'राग' सुरू झाला होता—

त्याचे नाव 'अनुराग' !

हे 'गुरु' तरलाबाईंच्या अगदीं जवळ जाऊन बसले होते तबोऱ्यावर नीट बोटें फिरवून सारखा 'सूरभरणा' कसा चालू ठेवावा याचें प्रात्यक्षिक ते एकाच तबोऱ्यावर तरलाबाईंचीं बोटें धरून दाखवीत होते मधूनच त्याचें डोकें तरलाबाईंच्या डोक्याजवळ जाई—हो, कदाचित् सगीताची काही गूढ माहिती कानातही सागावी लागत असेल, कुणाला ठाऊक !

बाहेर बुवासाहेबाचीं जड पावलें वाजलीं—पावलागणिक कड्कड् बोटें मोडल्यासारखा त्याचा आवाज होइ तो त्याच्या शागीर्दांना चागला परिचित झाला होता त्या आवाजाबरोबर या शागिर्दानें चपापून दूर सरून चीज सुरू केली

घन—घऽऽन—बाऽऽजे !

—अहो तरलाबाई 'पटदीपात' निषाद शुद्ध लागतो कोमल —नव्हे—

खरें आहे, पण त्या सुराइतकाच शिक्षकही 'शुद्ध' लागतो हें त्याना कोण सागणार ?

—रात्रीं आठाचा सुमार असेल गायन शाळेंतली वर्दळ आता बहुतेक सपली होती. जास्त गति झालेली, बुवाच्या खास मर्जीतली शिष्या म्हणून बुवासाहेब स्वतः विमलला झिंझोटींतील ठुबरी शिकवीत होते. प्रत्यक्ष

मोजुद्दीनखा जवळून आपण या प्रसिद्ध ठुमरीची तालीम घेतली असून, अब्दुल करीमखा ही ठुमरी सदोष गातात असे ते सर्वांना ठासून सागत

बुवासाहेबाच्या लहानशा खोलींत चदनी उदबत्तीचा घमघमाट दरवळला होता डाव्या खाद्यावर टेकलेल्या तबोऱ्यावरून विमलची बोटें हळुवारपणे फिरत होतीं उजव्या पावलान तिने स्वत. ठेका धरला होता शेजारीं बसून बुवा डग्ग्यावर ताल दाखवीत होते

पिया बिन नाहीं आवत चैन !

वातावरण धुद करून टाकणारे आर्त मधुर स्वर विमलच्या कठातून येत होते गायनसमाधींत ती देहभान विसरुन चालली होती बुवानी तान घ्यावी, विमलन ती सही—सही, खटक्या मुरक्यासह ती आपल्या कठातून कादावी—

—कैसे कहू बिन बैऽऽन
—बिन बैऽऽा
—पियाऽऽऽ

शब्दाशिवाय केवळ 'आलापचारीं' नेच भावनेची उन्मादक आर्तता व्यक्त होउ लागली भोंवतालचें वातावरण धुदकारल्या सारख झाले

—तबोऱ्यावरील गौर, नाजुक, सडपातळ बोटावर, राठ, स्पर्श पिपासु ओटे मिटलीं

कानात घुमणाऱ्या स्वराच्या धुदींत विमलचे डोक, माग बुवाच्या खाद्यावर टेकल गले तिचे डोळे आलापाच्या कैफाने मिटले—दुहेरी बोटाखालन निसटलेल्या, खर्जातल्या तारेचा मद, जड झकार अजून तिच्या कानात घुमत होता

उष्ण, आधाशी ओंठाचा स्पर्श होताच मात्र विजेचा धक्का बसल्या—प्रमाण तिचे सारे अग शहारल—तिचे डोळ एकदम उघडल तबोऱ्यावर मुडवलेलीं आपलीं बोटे साडवून घउन ती एकदम उठून उभी राहिली—तिच्या नजरेला नजर देण्याची सराईत बुवाचीही छाती होइना गोरेमोरे होउन, ओंठावरून जीभ फिरवून ते सारा प्रकार हसून थट्टवारी नेण्याचा प्रयत्न करू लागले—

त्याचा अडवणुकीचा हात झिडकारून विमल तडक घरीं निघून गेली

—त्या रात्रीं तिची उशी आसवानी भिजून चिंब झाली होती

* * *

—" याव वकील साहेब, आपलीच वाट पहात होतों "

दुसऱ्या दिवशीं रात्रीं दहा वाजता बुवासाहेबानीं हस्तिदती स्वागत केले

—" अन् विमल तू अजून वडिलाच्या मागेच का ! किती वाट पाहिली मी तुझी ! स्त्रियाकडची बैठकीची व्यवस्था शेवटीं मलाच पहावी लागली कीं !" बुवा एक प्रश्नार्थक कटाक्ष तिच्याकडे टाकून म्हणाले

कालच्या प्रकारानतर पुन्हा या गायनसमाजात पाउल टाकण्याची विमलची इच्छा नव्हती पण दुसऱ्या दिवसाच्या बैठकीचे आमत्रण वसतरावानो आधींच घेउन ठेवले होते मुद्दाम मागे रहायचें म्हणजे झाल्या गोष्टीची वाच्यता करून, आपलाच अपमान सागावा लागला असता म्हणून मन घट्ट करून, ही वेळ शेवटची समजून, ती वडिलाबरोबर बैठकीला हजर राहिली होती

अस्सल उत्तर हिंदुस्थानी ढगाच्या गाण्याची बैठक म्हणजे एक और चीज असते प्रत्यक्ष गाण्याऐवजीं अवातर भपक्यानेच श्रोत्याना-दिपवून टाकण्याची कला उत्तरेतच पाहून घ्यावी बुवासाहबानीही खासाहेबाना खूष करण्यासाटीं हुबेहूब लखनौचा थाट उठवून दिला होता

उसनवारी करून मिळविलेला का होइना, पण उभे पाउल आत रुतेल इतका उच, मऊ, लाल भडक रगीत गालिचा-पाढऱ्या शुभ्र च्यादरीवर अथरला होता तक्के, लोड इतस्तत. विखुरले होते 'समाजात' असतील नसतील तितकीं सारीं ( मोडकीं तोडकीं दखील ) वाद्यें गवसाण्यात बद करून चौफेर भितींवर खुट्याना लटकावून दिलीं होतीं खासाहेबाच्या गादीसमोर पानसुपारी जर्दाचे तबक, उजवीकडे उची गुलाबकळीच्या गूडाखूचा हुक्का, आणि डावीकडे लखलखीत घासलेली पितळी पिकदाणी

साडेदहा झाले तरी खांसाहेबांचा पत्ता नव्हता. त्यांच्या शागीर्द साजिंद्यानीं तंबोऱ्याच्या तारा पिळवटून, तबल्याच्या लांकडी गठ्ठयावर हातोड्याचे घाव घाल-घालून श्रोत्यांचा अगदीं अंत पाहिला नंतर तंबोऱ्याचा झंकार, मधेंच तबल्याची थाप यानींच शांततेचा भंग होत होता श्रोते टकमक एकमेकांकडे पहात स्वस्थ बसले होते खांसाहेबां-कडे बोलावण्यावर बोलावणीं जात होती

शेवटीं एकदाची खांसाहेबांची स्वारी आली ते दारांतून येताच सान्यांचे डोळे त्यांच्यावर खिळून राहिले डोक्यावरील कुसुंबी रंगाचा पन्नास हाती फेटा, लालबुंद डोळे, आकडेदार मिशा, मेंदीनें लाल रंग-लेली दाढी, बंद गळ्याचा पंधरा गुंड्याचा लांबलचक कोट, आणि तंग माडचोळणा— या त्यांच्या दर्शनानें गाण्या आधींच श्रोत्यांवर त्यांची छाप बसली.

प्रथम गायन समाजातील एक दोन किन्नरी आवाजाच्या मुलांनी ईशस्तवनाची पदें म्हटल्यावर "आप–बैठिये-नहीं नहींजी–आप बैठिये" नहीं नहींजी- आप बैठिये " या आग्रहांतच दहा मिनिटें गेलीं शेवटीं बुवानीं स्वत: हात धरून आदरानें बंदे हुसेखांना गादीवर बसविलें. कोटाचें वरचें बटन सोडून, घसा साफ करून, त्यांनीं डोळे मिटून स्वर लावला.

साथीदाराशेजारींच गुढगे टेंकून खांसाहेबांच्या शागीर्दाची प्रभा वळ पवित्र्यात बसली होती

"थेऽ म्हासें कांइ राऽर" ।

या ' भूपा 'तील ख्यालाला खांसाहेबांनीं सुरवात केली साधा पांच खड्या सुराचा राग, परंतु एखादा ' मुष्किल ' राग गावा अशा आवे-शानें वेडे वाकडे हातवारे करून खांसाहेब तो गात होते. पहिल्या 'समे'वर येताच ' ओहोहो ! ' म्हणून एका शागीर्दानें सलामी दिलीच जरा वाकडी तान घेतली, खटका साधला ' बोल तान ' आली कीं,

—माषाल्ला !

—सुभानल्ला !

—क्या कहूं ! क्या कहूं–बहुत खूब !

या उद्गाराची शागीर्दांची फैर झडे. त्यामुळें इतरानाहि नाइलाजान वाहवा द्यावी लागे ती ऐकली न ऐकली करून त्या त्या दिशेकडे जरा मान वाकवून खासाहेब ऐटीनें मुजरा करीत

करवतीवर कानस घासावी असा कर्कश आवाज असूनही, ' बहोत बडा ख्यालिया ' म्हणून खासाहेबाची ' अलम् दुनियेंत ' प्रसिद्धि आहे अशी अनाहूत जाहिरात त्याचे शागीर्द शेजारच्या श्रोत्याच्या कानाना लागून करीत होते

स्वत दोन ताना घेऊन खासाहेब तोंडावरून लालभडक रुमाल फिरवीत, मागें बोट करीत मागे तंबोरा धरुन बसलेला शागीर्द तो स्वर उचलून घेऊन आपलें कसब दाखवी. अशा प्रकारें पाऊण गाणें मेहनती शागीर्दांचेंच, वरची भडक मखलाशी आणि सारें श्रेय खासाहेबाचें. थोडेसें शास्त्र असले तरी या कसरती गायनात कलेचें लालित्य नव्हतें, कीं भावनेची रगत नव्हती

वसतरावाच्या डोळ्यावर झोंपेची झापड चढू लागली

  

गायन समाजाच्या आवारातील एका दूरच्या खोलींत कॉफीची तयारी चालली होती विमल आणि तिच्या मैत्रिणी याकडे हें काम दिलें असलें तरी बुवाचे अनेक शिष्य सारखे काहींतरी निमित्त काढून तेथें रेंगाळत होते मधेंच कडकड बोटें वाजवीत बुवासाहेब ही तेथें आले. त्याच्या पावलाच्या बोटाचा आवाज ऐकूनच बरेचसे शार्गीद पळाले, उरलेल्याना बुवानी एक रागाची नजर टाकून पिटाळून लावले

साऱ्या खोलीभर लहान मुलींची खेळकर पळापळ चालली होती. हासहासून त्या कपबशा माडीत होत्या.

बिचाऱ्या निष्पाप, आनदी मुली !

आपल्या मास्तराबद्दल त्याना किती अभिमान वाटे ! कोणी त्याच्याबद्दल वावगा शब्द काढला कीं रागानें चवूसारखे तोंड करून, फुरगुटून त्या मान वळवीत– ' आमचे मास्तर किनि कित्ती कित्ती चांगले

आहेत ' म्हणून त्याची तरफदारी करीत  बुवासाहेब खोलींत आल्याबरोबर त्या साऱ्या भर्रकन्, चिमण्याच्या थव्यासारख्या त्याच्याभोंवतीं जमल्या. त्याची आनदी उत्साही किलबिल सुरु झाली

—' मास्तर पुढच्या बैठकींत मी नमनाच पद म्हणू ? '

—' मास्तर माझ कालच पद कित्ति किति छान बसलय ! '

—' मास्तर ही सरू म्हणते, ' तुझा आवाजच घोगरा आहे, तुला गाण यायचच नाहीं,—नाहींना हो अस मास्तर ! '

या सर्व लहान मुलींच्या आनदी, उत्साही बोलण्यानें बुवाच्या कपाळावर आठ्या मात्र चढल्या-त्याना खसकन् दूर लोटून ते दुसरीकडे वळले, आणि काहींतरी एकदम आठवल्यासारखे करून म्हणाले, " अग कमल, तुझे वडील किटल्या देणार होते ना आज—मग आल्या नाहींत त्या अजून ? जा घेऊन य त्या—अ ?—मित्री कुठली, बर, बर, या सगळ्याच मुलींना पाठवितों तुझ्या बरोबर, मग नाहींना भीति वाटायची ? जा ग साऱ्या कमलबरोबर अन् त्या किटल्या घेउन या, पण त्या इकडे आणू नका आताच, गाण चाललय ना, त्या दिवाणखान्याच्या पलीकडल्या खोलींत ठेवा— मी इकडल काम आटपून तिकडेच येइन तोंप येंत बसा तिकडेच ह, चला, पळा, लहान मुलींनीं कस सदा तुरतुर पळत असाव—हऽऽ "

भोळ्या बिचाऱ्या मुली  मास्तराच काम ! मग ते साऱ्याच्या, घरच्या माणसाच्याही अगादर झाल पाहिजे अशी त्याची समजूत  क्षणात त्याचा थवा हसत, बागडत बाहेर निघाला  त्या निघाल्याबरोबर त्याच्या मागोमाग विमलही बाहेर पडत होती— पण चटकन दारात तिला आडवून बुवा हसत हसत तिला म्हणाले —" जाउ दे, मरु देत तिकडे त्या पोरीना— मुद्दामच पाठवून दिल मी त्याना मी तिकडे  बैस कीं— अग तूऽऽकुठें चाललीस त्याच्या बरोबर ! "

कालच्या प्रकारानतर बुवाचें विमान बरेच वर चढलें होते  विमलच्या मूकतेचा आणि पुन्हा ' समाजात ' येण्याचा अर्थ त्यानी समति णूनच घेतला  ते आता अगदीं खुषींत येत होते  दार लोटून ते

तिच्याकडे निघाले—' आता येत नाहीं कोणी इथे तासभर– लाजतीस काय इतकी, अऽऽ ? '

बुवाच्या या लघळपणाच्या शब्दानंतर मात्र विमलचा राग बेफाम पणें बाहेर पडला

' मास्तर, तुम्ही इतके नीच असाल अशी माझी कल्पनाही नव्हती. काल गाण्याच्या धुदींत मी क्षणभर भान विसरलें त्याचा अर्थ मी तुम्हाला अशीच बळी पडेन म्हणून तुम्ही घेता का ?–जाउद्या मला '

बुवाच्या डोळ्यात आता विषयाचा कैफ चढत चालला होता. तिचा हात हातात घेण्याचा त्यानीं प्रयत्न केला— त्याना झटका देऊन दाराकडे वळत ती चवताळून म्हणाली—

—" हीच तुमची कलोपासना ना ?–कलावंत म्हणविता तुम्ही– हेच तुमच्या कलेचं पावित्र्य ! तुम्हाला वडिलासारखं मानून मी मोकळे-पणानं इथं आलें, आईच्या इच्छेविरुद्ध त्रागा करून इथें येत गेलें–अन् तुम्ही ? तुम्ही अशा भावनेनं माझ्याकडे पहाता ? "

बुवा आता दाराला पाठ देउन उभे राहिले एक विकट हास्य करून ते म्हणाले--' पुरे गं तुझं तत्वज्ञान ! अगं, गावं वाजवावं, चार दिवस मजा करावी मोकळं असेपर्यंत कोण कुठलं, नी कोण कुठलं ? कोण विचारायला बसलय् तुला मागलं ? अगं आता चार दिवसात भुर्रकन् उडून जाल पाखरासारख्या आपापल्या घरट्यात, मग कुठली आठवण रहाणार आहे आमची ? जातीं घडी साधावी, तुला अजून काय ठाउक आहे ? मागून माझेच आभार मानशील मनात अन् हे बघ, तुला या निमित्तानं एकट भेटता येईल म्हणून तर ही मेफल घडवून आणली मी— नाहीं तर आमच्या विमलाबाइ अशा अवेळीं कशाला येताहेत इकडे— अन् भेटताहेत आम्हाला ! हं, आता किती रुसायचय्—त्या मुली यायच्या परत '

बुवा पुढें सरकू लागलेले पहाताच विमलनें ओंठ चावला— ' खबरदार मास्तर पुढे पाउल टाकाल तर ' तिने दटावले.

रागाने थरथरत असताही प्रसंगावधान राखून, ती शेगडीवर

उकळणाऱ्या कॉफीच्या मोठ्या थोरल्या पातेल्या मागें जाउन उभी राहिली. खंबीर स्वरात ती म्हणाली

"— मास्तर! अजून तोल सावरा, गुरु आहात तुम्ही माझे म्हणून शेवटचें सांगते—पण लक्षांत ठेवा, एक पाउल पुढं टाकाल तर हें सारं आधण ओतून देइन अंगावर, गय करणार नाहीं शहाणे असलात, तर स्वतःचा मान राखून बाहेर व्हा ."

बुवांना मात्र हें सारें सोंगच वाटत होतें— काल संगीताच्या धुंदींत बेभान होउन आपल्या खांद्यावर मान टाकणाऱ्या या नादलुब्ध हरिणीचें रुपांतर आज एखाद्या चवताळलेल्या वाघिणींत होऊं शकेल हें त्यांना शक्यही वाटेना तरी विमलचा लाल भडक चेहरा, दातांत दाबलेला ओंठ आणि करारीपणानें मनगटावरून बांगड्या मागें सारून, पातेल्याच्या कडे भोंवती तयारींत पसरलेले हात—या दृश्याकडे पाहून ते गांगरून जरा थांबले—दोघांच्या नजरा जलालपणें एकमेकांवर रोखल्या होत्या—

बाहेरून अस्पष्टपणे खांसाहेबांच्या 'दरबारी कानड्या' तील तानांचीं घनचक्रें ऐकूं येत होतीं

नैनसों नैन मिला रखोरे ।
मनवाऽमोराऽरे ।

'दरबारी' सारखा गंभीर प्रकृति विलपतीचा राग! मंद लयींत खर्जातले स्वर लावले तर अंगावर आनंदाचे रोमांच यावेत, 'मींड' चालली असतां श्रोत्याचें हृदय भरून यावें असा त्याचा प्रभाव—पण बदेहुसेन खां द्रुतलयींतल्या कर्कश, ताना–बोलतानांच्या करवतीनें त्याच्या नुसत्या चिरफळ्या करून टाकीत होते हींव भरल्याप्रमाणें थाड्–थाड् उडत बरल्या सतकांत त्याची तान चालली कीं जवळून आगगाडी गेल्याचा भास होई गुढग्यापर्यंत मान नेत पेंगणारे वसंतराव एका विक्राळ हुंकार डकारानें दचकून जागे झाले—खांसाहेबांची प्रसिद्ध 'मुखबंदी' तान चालली होती!

ते कटाळून उठले — विमलला घेउन जाण्यासाठीं आंत गेले—

सान्या खोल्या उघड्या होत्या त्यात विमल दिसेना ते पुढें जातात तों एक खोलीचें दार आतून बद दिसलें आतले काहीं अस्फुट रागाचे शब्द त्याच्या कानावर येउ लागले–विमलचा आवाज त्यानीं ओळखला–

'नीचा!'

धप्!

आतून एक मोठा आवाज झाला

लोटलेल्या दाराखालून जायफळाचा घमघमाट सोडून उकळत, उसळत, कॉफीचा बेफाम लोट बाहेर वहात आला

बुवाचा उल्लुपणा शेवटीं मर्यादेच्या बाहेर जाऊ लागलेला पाहून विमलने सारें बळ एकवटून कॉफीचे मोठे पातेलें खरोखरच त्याच्याकडे लोटून दिलें होतें. अगदीं थोडक्यात चुकले, नाहींतर बुवाची रवानगी थेट इस्पितळातच करावी लागली असती कॉफीचा लोट येताच त्यानीं चपळा ईनें बाजूला उडी घेतली, तरीही जमिनीवरील लोटानें त्याचें एक पाऊल सडकून भाजून निघालेंच ते बाजूला होताच विमल कडी उघडून बाहेर निघाली, तों दाराशीं वसतराव उभेच त्यानीं रागानें विचारलें—

—'काय प्रकार आहे हा बुवा!'

भाजल्यानें पायाची, आणि अपयशानें, अपमानानें त्याच्या हृदयाची लाही लाही होत होती पण तशातही वाकडें तोंड करून, नेहमींप्रमाणे खाक रून वेळ मारून नेण्याची त्यानी प्रयत्न केला—

—छे, छे, काहीं विशेष नाहीं वकीलसाहेब तुमची विमल जरा वेंधळी नी उतावळी आहे एवढेंच आताच पहा, इतका वेळ श्रम करून, मधल्या विश्रातीच्या वेळेसाठीं मी कॉफी तयार केली, अन् हिन खुळीन इकडून तिकडे करताना लावला धक्का शेगडीला–अन् सारी कॉफी पालथी झाली बघा पण जाऊ द्या, पोर आहे अजून—तिला रागावू, बोलू नकाहो काही!"

या अस्सल, अट्टल कागाव्यानें विमलही दचकली जगातला सराइत, निर्ढावलेला, बदमाषपणा कसा असतो हें आयुष्यात पहिल्यानेंच तिला त्या क्षणात समजून चुकलें. ती जड आवाजात म्हणाली

—चला, दादा, या नरकात आता एक क्षणसुद्धा उभ रहाण्याची माझी इच्छा नाहीं अट्टल बेरडाप्रमाणें धडधडीत खोट रचून सांगताहेत हे मी कॉफी सांडली खरी, पण ती सहज धक्का लागून सांडली हें अगदीं खोट मी ती सारी मुद्दाम लोटून दिली याच्या अंगावर—कां लोटली हें विचारा बर यानाच !—आहे का तोंड उत्तर द्यायला ? वर बघा बर जरा ?

भाजून लाल, अन् सुजून फुग्यासारख्या झालेल्या आपल्या पाव-लाला कुरवाळीत, खालीं पहात बुवासाहेबानीं जमिनीवर बैठक मारली होती–त्याच्याकडे धि काराची एक नजर टाकून विमल वडिलाबरोबर घरीं निघाली

त्या रात्रीं बदे हुसेनखाची बैठक कॉफीपानाशिवायच या ‘अप घातानें’ विरस होऊन अर्ध्यातच संपली

❦ ❦ ❦

दुसऱ्याच दिवशीं वसतरावानीं विमलचें नाव त्या गायनसमाजातून काढून घेतलें झाल्या प्रकाराची खणखणीत वाच्यता करून इतराना अशा धोक्यापासून सावध करणें त्याचें कर्तव्य होतें पण—?

तसें करणे म्हणजे स्वतः होऊन चिखलात दगड टाकणें होय असे त्याच्या व्यवहारी बुद्धीला वाटले ज्या बहुजन–समाजासाठीं हें करायचें त्या समाजात बुवासाहेबाना पुरुष असण्याच्या थोर लायकीमुळें शभर गुन्हे माफ होतेच आणि उलट स्त्री असल्याच्या अपराधामुळें नसता कलक अगी लागून, विमलच्या साऱ्या जन्माचें मातेरें होण्याचाही सभव होता

विमलनें गायन समाजातलें नाव काढून घेतलें, पण एक पाय तुटल्यानें का गोम लगडी होते ?

बुवासाहेबाचा ‘राधाविलास’ गायनसमाज अजूनही जोरात चाललेला आहे अजूनही दुपारच्या स्पेशल क्लासाना प्रौढ स्त्रिया आपलीं छोटीं हात–पाकिटें हालवित जाताना दिसतात—अजूनही वेळीं अवेळीं खास शिष्यांची तालीम चाललेली असते, आणि परस्थ खासाहेबाच्या

मैफली अजून रात्रीं बेरात्रीं झडतात. बुवांच्या खास देखरेखीखालीं तयार झालेल्या कॉफीनें त्या बैठकींना रंगत येते

या साऱ्या यशात विमलचें प्रकरण मात्र आलेल्या अपयशानें बुवांना दात ओठ खायला लावीत असतं तिची आठवणही विसरण्याचा ते यत्न करतात, पण त्यांच्या भाजलेल्या काळ्या पावलावरील, कोडाप्रमाणे पांढरा फटफटीत कायम राहिलेला डाग त्यांना ती विस्मृति लाभू देत नाहीं

कोणी ओळखीच्या मनुष्यानें त्यांची 'खास शिष्या' विमल हिच्याबद्दल प्रश्न केला कीं त्यांची नजर कावरीबावरी होते खाकरत, इकडे तिकडे पाहून, उपरण्या आडून ते हळूच बोलणाऱ्याच्या कानाला लागतात आणि म्हणतात—' हें पहा! तुम्हालाच म्हणून सांगतों, पण अगदीं गुप्त ठेवा बर! उगीच एखाद्या मुलीच्या अब्रूवर कशाला शिंतोडा उडवा? त्या मुलीचं वर्तन वावग होतं पूर्वीपासून— माझ्या शार्गीदाबरोबर एकदा अचानक पकडलं मी तिला—मग तिनं सारं कबूल केलं झकत— शेवटीं मी होउन काढून टाकलं तिला आमच्या गायन समाजातून म्हटलं हो, उगीच टीकेला जागा तरी ठेवा कशाला?— असल्या संगीत संस्थांतलं नैतिक वातावरण पवित्र ठेवण्याची केवढी जबाबदारी आहे माझ्यावर! —मी या बाबतींत तर अगदीं डोळ्यांत तेल घालून काळजी घेतों बुवा!'

अगदीं खरं आहे

योग्य कोण, अयोग्य कोण, मुलींना कुठें पाठवावं, कुठें न पाठवावं या चौकशीबद्दल जोंपर्यंत प्रत्यक्ष पालकच बेफिकीर आहेत तोंपर्यंत ही जबाबदारी बुवासाहेबांसारख्या 'कलावंतां' वरच— नाहीं का?

---

## ८ : मांजरीचीं पिलें.

A good story

म्यॉव्-म्यॉंव-मयॅऽऽव्!

भल्या पहाटेस दाराजवळ आवाज आले शुक्-शुक्-म्हणून, एका व्यक्तीनें पुन्हा पांघरुणात तोंड लपविलें दारावर नखानें ओरखडल्या-सारखा, खर्र् खर्र् असा आवाज सारखा येऊ लागला मधूनच अगदीं 'खर्जा'तला 'म्या ऽऽऽव्' असा रडवा सूरही येई

'काय त्रास आहे शिंचा!—कुठलं मांजर आलंय् धडपडायला' म्हणून केशवरावानीं पडल्या पडल्याच हाक मारली 'अरे रामरतन! दाराशीं बघ कुठलं मांजर ओरडतय—दे हाकून त्याला'

पण रामरतनचा जवळ कुठं पत्ता होता!

अंगणातल्या नळावर धडाधड कपडे आपटीत तो भसाड्या स्वरात 'दोहे' ललकारीत होता—

"दया धरमका मूल है—पापमूल अभिमान
तुलसी दया न छांडिये—जब लग घटमें प्रान
तुलसी हाय गरीबकी—'

एवढ्यात केशवरावांच्या अंगावरचें पांघरूण खसकन् ओढलें जाऊन

दूर जाउन पडलें 'शेजारून' आलेली ही सूचना लक्षात घेऊन तेच शेवटीं उठले हातात काठी घेउन त्यानीं दार उघडलें

—एक पादरी शुभ्र, किडकिडीत माजरी पायरीवर उभी होती. शेपटी ताठ करून, केशवरावाच्या पायाना अग घाशीत तिनें आपले पाचू-सारखे हिरवे, दीनवाणे डोळे त्याच्याकडे रोखले—आणि हळूच आवाज काढला—म्यॉव् !

केशवरावाना आठवण झाली गेले पधरा दिवस ती माजरी त्याच्या वाड्याभोंवतीं फिरत होती केशवरावाच्या घरून तिला उरलेसुरलें अन्न मिळत असे गेले चार दिवस मात्र ती कुठे नव्हती केशवरावानीं दार उघडल्याबरोबर ती घरात पळाली चहा होईपर्यंत, दाराशीं टाकलेला ताजा वृत्तपत्राचा अक घेउन केशवराव चाळीत होते परतु त्यातील ताज्या बातम्यापेक्षा घरात शिरलेल्या नव्या माजरीच्या चमत्कारिक वागणकीचेच त्याना अधिक कुतूहल वाटत होते खोलीभर गरगर फिरत, कपडे—पुस्त-काचीं कपाटे धुडाळीत, वास घेत ती फिरत होती चहा सपल्यावर केशव-रावाच्या अगात गृहस्थाश्रमी आतिथ्यधर्माचा सचार होऊन ते एका बशींत थोडें दूध घेऊन बाहेरच्या खोलींत आले—परतु त्याची ती पाहुणी आली तशीच एकाएकीं गुप्त झाली होती

बाहेर रामरतन दुकानाच्या फळया उघडीत होता त्याचा फट–फट आवाज होत होता लक्ष्मीच्या फोटोसमोर पेटविलेल्या उदबत्तीचा सुगध आत आला, आणि एका गिऱ्हाइकाची 'मालक !' म्हणून हाक आली—त्याबरोबर केशवराव उठले.

त्यानीं नव्या गिऱ्हाइकाचा 'कॅश—मेमो' फाडला, आजसाठीं शिल्लक मोड खुर्दा मोजून, गादीवर रेलून सिगारेट शिलगावली

कापडाचे तागे ठेवण्याच्या कपाटाच्या सरक–काचा पुशीत, राम-रतन तक्रारीच्या स्वरात त्याना सागू लागला—'अजी साइब ! व्यापार करत होंकि दिल्लगी करत हो ! उधार वसूल करन खातिर हमे राखिन है, और कहत हो कि जोरसे बोलोना ! नहीं तो कौन अस सपूत है जो तोहार रुपैया देत नहीं ?—हमार डडासे खुपरिया फोर डारिब !"

( साहेब व्यापार करता कीं थट्टा ! उधारवसूलीसाठीं मला ठेवलत अन् म्हणता कीं जोरान बोलूही नको— नाहीं तर कुणाची माय व्याली आहे पैसे न द्यायला ? माझ्या दडानें टक्करच फोडून टाकतों )

हे शब्द ऐकून सात्विक स्वभावाच्या केशवरावाना कसेंसेंच झालें. ते म्हणाले "हे बघ रामरतन ! तुझा दडा अन् तुझ तोंड, दोन्हीही सभाळ. तुझ काम उधारी वसूल करायच आहे, मारामारी करायच नाहीं पैसे न देणारासाठीं कोर्ट आहेच .'

फडकें खाद्यावर टाकून रामरतननें आपली टीचभर मलमलीची टोपी डोक्यावर कलती ठेवली—मिशाना पीळ भरून तो म्हणाला—

'अरे कोरट–कोरट क्या बकत हो साहब !—हमार जैसे लठैत "
( कोर्ट–कोर्ट काय बडबडता–माझ्यासारखा लाठीवाला असल्यावर ).

इतक्यात आतून केशवरावाच्या पत्नीचा किंचाळण्याचा आवाज आला—"ई—ई—रे रामा ! होय ? लवकर यायच इकडे .."

केशवराव लगबगीनें आत धावल

दिवाणखान्याच्या खिडकीत त्यानीं सकाळीं पाहिलेली माजरी येऊन बसली होती. अगदीं ताबड–ताबड, उदराच्या पिलासारख लहानस पिलू तिनें तोंडात धरल होत. कोणी जवळ गेल कीं पिलाला खालीं ठेवून, शेंपूट पिस्कारून ती 'घुऽऽर्ऱ् ' असा रागाचा आवाज करी केशवराव आत येतात तों ती खालीं उडी टाकून, पडवींतल्या एका उघड्या कपाटाच्या खालच्या खणात जाऊन बसली देखील

केशवरावानीं जवळ जाऊन पाहिलें. अगदीं भुकेजून, वाळून गेली होती ती. तें इवलेंसें पिलू तिला चिकटून, पिण्याचा यत्न करी—आणि हताशपणें, अगदीं हळूच, 'म्यूऽऽ' असा आवाज करून खालीं पडे. हें दृश्य पाहून केशवरावाच्या पोटात कालवल्यासारखें होऊ लागलें. आत जाऊन त्यानीं एका वाटींत दूध आणून पडवींत ठेवल. तिनें पुन्हा आपले हिरवे डोळे त्याच्याकडे रोखले, पण भुकेनें वखवखलेली असूनही पिलाला टाकून ती बाहेर येईना. शेवटीं केशवरावानींच ती वाटी तिच्याजवळ खणात नेऊन ठेवल्याबरोबर तिनें क्षणात आधाशीपणानें सारं दूध पिऊन

टाकले तिच्या डोळ्यात समाधानाचा तजेला तरगू लागला विजेचा पखा फिरताना मद, सथ आवाज येतो त्याप्रमाणें घुर—घुर आवाज करीत तिनें त्याच्या हाताला डोकें घासलें

आतून त्याची पत्नी राधाबाई बडबडत होती–' काय मेला उच्छाद दिलाय् माजरीन ! हाकून द्यायला बोलावल तर तिचीच सटवीची व्यवस्था ठेवायला लागायच–आधींच काम कमी पडलींत जशीं घरात, अन् आता या बाळबाळतिणीची उस्तपास्त करायची उरलीय ! "

बाहेरच्या दुकानातून रामरतनचा पहाडी आवाज आला—" अजी साइब ! डाककी चिठियां आइन है ! "

दुपारपर्यंतचा केशवरावाचा वेळ गिऱ्हाइकाशीं हुजत घालण्यात, कापडाच्या घड्या घालण्या–मोडण्यात गेला. बारा वाजण्याच्या सुमारास गिऱ्हाइकाची वर्दळ कमी झाली कारकुनाला ' काउटर ' शीं बसवून ते स्नानासाठीं गेले दाढी, स्नान आटपून बाथरूममधून बाहेर येतात तों पडवींत आदळआपट, गडबड चाललेली दिसली वसूलीवरून परत आलेला रामरतन सतापून शिव्या मोजीत होता केशवरावाना पहाताच तो उसळला—

" अजी साइब ! कहू की साली बिलिया आइन है, तोन हमारे चौकाके पास, अलमारिया माहीं बचवा दीन है " ( अहो साहेब, कुठली साली माजरी आली—माझ्या सैपाकाजवळच्या कपाटात पिल ठेवलींत तिन ! '

केशवराव पुढें होण्याच्या आंत त्यानें तें थरथरतें पिलू चिमटींत धरून बाहेर भिरकावले

' कू–कू ' करीत तें फरशीवर वळवळू लागलें. माजरीचा मात्र कुठ पत्ता नव्हता अगदीं लाल भडक होत तें पिलू त्याच्या अगावर अजून केसही आले नव्हते डोळे घट्ट मिटलेले—अगाचा भारही सहन होत नसल्यानं त्याचे इवलेसे पायही रुदावून पसरले होते इकडे–तिकडे डोकें हलवून, थरथरत तें ' कू–कू ' असा आवाज करी. इतक्यात ती माजरी खिडकींतून उडी मारून नेमकी त्याच्या पायाशीं कोसळली.

—तिच्या तोंडात तसेंच दुसरें लाल पिलू होतें! त्यालाच आणायला गेली असावी ती.

तिला पाहून रामरतन आणखी सतापला—

" साली बिलीया, ऐसी तैसी—हमार चौका छुत कर दीन, बद मास कहू की "—

( चल् साली माजरी—माझा सैपाक विटाळला बदमाष कुठली!)

पिलू खालीं ठेवून, ती माजरी केस पिंजरून, पाय ताठ करून, पाठीची कमान करून पुढें आलेल्या रामरतनकडे गुरकावून पाहू लागली. अस्सल 'पूरब'च्या हिंदी भाषेत तडातड शिव्या मोजीत रामरतन लोट्यानें साऱ्या पडवीभर पाणी शिंपित होता

पुढें होऊन केशवरावानीं ते खालीं पडलेले पिलू अलगदपणे उचलून घेतलें त्याच्या हातात तें पाहून, दुसरें पिलू तोंडात धरून ती माजरीही तुरतुर पळत त्याच्या मागोमाग पुढल्या खोलींत गेली माजघरातील भिंतींतल्या कपाटाचा खालचा कप्पा मोकळा करून, तेथें एक जुनी सतरंजी घालून केशवरावानीं या बाळबाळतिणीची सोय करून दिली हें सारं काम त्यानाच करावें लागलें, कारण राधाबाई ही रामरतनप्रमाणें रागावून त्याच्या हळवेपणाला नावें ठेवीत उभ्या होत्या

—बाकी केशवरावाना त्या पिलाबद्दल इतका कळवळा का आला कुणाला ठाउक? पहिल्या तान्ह्या मुलाच्या मृत्यूनंतर त्याच्या घरातला पाळणा अजून रिकामाच राहिला होता—हें तर तें कारण नसावें?

  

एक आठवडा असाच गेला आता ती माजरी बरीच सुखावली होती तिचा पूर्वीचा किडकिडीतपणा जाऊन, आता ती एखाद्या केंसाळ, पांढऱ्या, लोंकरी ब्लॅकटेच्या गोळ्यासारखी गुबगुबीत दिसे तिच्या अंगाच्या उबेंत तिचीं दोन पिलें कुशींत तोंड खुपसून पडलेलीं असत. आता तिनें आपण होऊन केशवरावानाच आपले मालक अन् पालक नेमून टाकलें होतें असें दिसत होतें, कारण त्याच्याखेरीज कोणीही कपाटाजवळ आलें कीं तिच्या शेंपटीचे केंस ब्रशासारखे फुगत, पंजातलीं तीक्ष्ण,

बाकदार वाघनखें बाहेर काढीत्—'मॅऽऽऽव्' असा रागाचा आवाज काढून ती पाठीची कमान करी माजर–जातीचें 'मनी' हे सार्वजनिक नावच केशवरावानीं तिला दिलें होतें जवळ जाऊन, त्यानीं लाडानें 'मन्याऽऽऽ'! म्हणून लाडानें हाक मारली म्हणजे ती ऐसपैस जाभई देऊन, शेंपूट वर करून, हातपाय ताणीत उभी राही 'म्याऽऽऽऽ' अशी लाबलचक ओ देऊन, घुर्र–घुर्र करीत त्याच्या पायाना अग घाशीत ती भोवतीं फिरे

एके दिवशीं केशवराव सकाळीं उठून पहातात तों कपाटाचा कप्पा मोकळाच! दोन्ही पिलें घेऊन ती माजरी कुठेंतरी निघून गेली होती! इतकी माया लावून ही माजरी पिलासकट अशी अचानक निघून जावी याचें केशवरावाना फार वाईट वाटले. त्याच्या हालचालींकड पहात राधाबाई आतून बडबडत होत्या.

"किती लहान पोरासारख वागायच त्याला काही धरबध? किती जीव लावला म्हणून माजर कधीं कुणाची झालीय्? पिलाना तोंडात धरून सात घर फिरवाव लागत माजऱ्याना राणीसारखी व्यवस्था केलीत तरी रहायाची नाहीं एका ठिकाणीं"

मनीचा अज्ञातवास फक्त दुपारपर्यंतच टिकला वाड्यातली एक गृहिणी जिन्याखालून काही जिन्नस काढायला गेल्याबरोबर तिथून 'घुऽ-र्रऽऽ' असा रागाचा आवाज आला जिन्याखालच्या अधाऱ्या जागेतच मनीनें आपले कुटुब हलविलें होते तिला हलविण्यासाठीं बिऱ्हाडकरूचे किती तरी निष्ठुर तडाखे तिच्या अगावर बसले, पण ते सारे सहन करून, पिलाना पोटाशीं घेऊन ती तशीच निमूटपणें पडली होती. सध्याकाळीं अगदीं भुकेजून ती केशवरावाच्या बिऱ्हाडीं गेल्याबरोबर त्या बिऱ्हाडकरूने तीं दोन्हीं पिलें उचलून दूर, कपौडच्या काठाशी फेकून देऊन आपली जागा मोकळी करून घेतली रात्रीं त्याच्या क्षीण आवाजाच्या अनुरोधाने माग काढून, केशवरावानीं तीं पिले पुन्हा आपल्या घरात आणून ठेवलीं.

अशा प्रकारे केशवरावानीं रोज रात्रीं कदील घेऊन, धुडून तीं

पिलें घरात आणावींत आणि मनीने सकाळीं पुन्हा तीं तोंडात धरून एखाद्या बिऱ्हाडात नेउन ठेवावींत असा गनीमीकाव्याचा प्रकार सुरू झाला सार्‍या वाड्यात आता तीं 'केशवरावाची माजर' म्हणून ओळखलीं जाऊ लागलीं

"बाई, बाई, काय उच्छाद दिलाय् या कशवरावाच्या माजरीन, आम्हाला का मेला त्रास? गळ्यात बाधून बसा आपल्या हव तर!" म्हणून रोज दोन—तीन निरोप त्याच्या घरीं जाऊ लागले शेवटीं खूप हालहाल होउन, अनेक बिऱ्हाडें बदलून, वाड्याची पृथ्वीप्रदक्षिणा करून, मनीने पुन्हा कशवरावाच्या पहिल्या घराला आपला उदार आश्रय दिला

आता त्या पिलाचे डोळे उघडले होते काळेभोर अन् टपोर्‍या मण्यासारखे दिसत ते पाढरी शुभ्र, दाट लव आता त्याच्या अगावर आली होती फक्त कानाचे कोंपरे अन् शेपटीचा गोंडा एवढाच भाग काळा असल्यानें तीं फार शोभिवत दिसत कपाटातून हळूच खालीं उतरून, तीं आता तुरतुर इकडे तिकडे फिरू लागलीं एखाद्या नव्या जगाचा शोध लावावा त्याप्रमाणें टेबल, खुर्ची, सतरजोवरील तक्या, या वस्तूजवळ तीं कुतूहलाने जात, एकदम भ्याल्यासारखें करून, मागें कोलाटी मारीत एकमेकाना हाका मारून, मान वाकडी करून, मागील पायावर बसून त्या वस्तूकडे पहात रहात सुताचा गुडा, कागदाचा उडता कपटा, याच्याशीं खेळत, उलटसुलट कोलाट्या मारीत तीं तासचे तास खेळत असत

दुकानातून आल्यावर या पिलाच्या आनदी खेळण्याबागडण्याकडे पहात रहावे हा केशवरावाचा विरगुळ्याचा कार्यक्रम झाला होता त्यानीं त्या पिलाना हळूच उचलून माडीवर घ्यावे—त्यानींही आपल्या पजात केशवरावाचीं बोटें धरून, खेळत, हळूच खेळकरपणाने बारीक दातानीं चाव घ्यावे रागाऐवजीं आनदाच्याच लहरी कशवरावाच्या अगातून उसळत. मागील पायात मान घालून, अगाचा गोळा करून तीं पिलें विश्वासानें त्याच्या माडीवर झोंपी गेलीं म्हणजे एखादे वेळीं नकळता

त्याचे डोळे भरून येत  हृदयात कालवल्यासारखे होई—आणि शून्य घरात भिरभिर नजर फिरे

तीं पिलें घरात इकडेतिकडे धावू लागल्यावर मात्र केशवरावाच्या गृहराज्यात बडाळी आणि यादवी सुरू झाली  सोंवळयात असलेल्या राधाबाईच्या पायात जाऊन तीं कधीं घोंटाळत, देवघराच्या स्वर्गात शिरून प्रत्यक्ष देवाची उलटापालट करून टाकीत  या अधार्मिकपणाचें प्रायश्चित मिळालें म्हणजे गुपचूप आपल्या जागीं येऊन तीं शहाण्यासारखीं निजून रहात  दुधात पुन्हा पुन्हा तोंड घालून, पळापळीनें सगळीकडे गोंधळ करूनही तीं पुन्हा केशवरावाकडे अशा अव्याज, अश्राप, गभीर नजरेनें पहात कीं तींत साऱ्या जगाचा निर्दोषपणा बिंबलेला दिसे. पुन्हा तास अर्धातास झाला कीं त्याच्या खोड्याना सुरुवात होई  शेवटीं त्याचा मार चुकविण्यासाठीं त्याना बाहेरच्या खोलींत कोंडून मगच ते दुकानात जात

एक दिवशीं दार जरा किलकिले राहिल्यान त्यातलें एक पिलू बाहेर येऊन फिरू लागले  दुपारीं बाराचा सुमार होता इतक्यात राम-रतनच्या सैपाकाच्या पडवींतून एकाएकीं रागाचे, ओरडण्याचे आवाज येऊ लागले  केशवराव लगबगीने आत आल तो भय्याने रागाने एक भाडे त्याच्यापुढ आदळले  ‘ अरे पण झाल तरी काय ? ’ म्हणून त्यानीं विचारल्याबरोबर तो उसळला—

—“ क्या भवा-क्या भवा ! क्या पूछत हो साहब ? तोहार बिलैया हमार दूध पी गइन-हमार दाल—रोटी छत्त हुई गइन ” ( काय झाल म्हणून काय विचारता साहेब ? तुमची माजरी माझ दूध पिऊन गेली माझी डाळ-रोटी विटाळली )

—‘ जाऊ देरे—अजाण जीव आहे तिला काय कळतय् ’ म्हणून केशवराव म्हणतात तोंच भैय्याने त्या पिलाचे मानगूट धरून त्याला रागाने खालीं, चौकातल्या फरशीवर जोराने फेकून दिलें. त्याचे डोकें फुटून, भळभळा रक्त वाहू लागले-एक गुदमरलेला आवाज काढून, हात-पाय झाडून त्यानें प्राण सोडला.

अगदीं शात आणि अश्राप दिसणारे केशवरावही या क्रूर प्रकारानें पिसाळले त्याच्या अगात एखादा वेताळ सचारल्यासारखें झालें.

‘ हरामखोर ! सैतान ! ’ म्हणून त्यानीं रामरतनचे मानगूट धरून त्याला असा जोराचा धक्का दिला कीं तो व्हराड्याखालीं, चौकातल्या फरशीवर आदळला अग झाडून उठल्यावर मात्र दडा सरसावून तो अद्वातद्वा शिव्या देत केशवरावाच्या अगावर धावला—साऱ्या वाड्यातलीं माणसें गोळा झालीं त्यानीं त्याला धरून ठेवले त्याची बडबड चालली होतीच—

“ अरे तेरी नोकरीकी ऐसी तैसी—साहब भवा हमारा—तेरे जैसे छप्पन्न देखिन है—भाड मा गइन तेरी नोकरी फिर हमको छू तो देख केशविया ! खुपरिया तोर डारिब आदमीसे बिलैया जादा भइन ! अस मानस कबहू देखा नाही हम ! ”

( झक मारते तुझी नोकरी—मालक झालाय् आमचा—तुझ्यासारखे छप्पन्न पाहिले आहेत मी. पुन्हा हात तर लावून बघ अगाला ! डोकच फोडतों, माणसाहून माजराची किंमत जास्त झाली अ ?—असा वागणारा माणूस नाहीं पाहिला कधीं )

केशवरावानीं मुकाट्याने घरात जाऊन चालू आणि पुढल्या महि-न्याच्या पगाराच्या नोटा आणून त्याच्या अगावर टाकल्या “ आत्ताच्या आत्ता सामान उचलून चालता हो इथून ” ते ओरडले “ माजराचा प्रश्न नाहीं हा, पण सहज एखाद्या निष्पाप प्राण्याचा जीव घेणारा माणूस नव्हे, हैवान आहे—चल चालता हो—तोड दाखवू नको पुन्हा मला ” केशवराव रागानें ओरडले

दुकानात कपाटामागे ठेवलेली वळकटी उचलून जाण्यापूर्वी राम रतननें आरडून ओरडून दुकानापुढच्या रस्त्यावर खूप गर्दी जमविली. पितळी पट्ट्या मारलेला काळा, जाड सोटा उगारून पुन्हा तो पुन्हा आवेशानें ओरडत होता. बजरगाचा ताइत, गाठलेला काळा दोरा, तट्ट शिरा फुगलेल्या त्याच्या गळ्याशीं आवळला होता. डोक्यावरची कलती टीच-भर मलमलीची टोपी, गुढग्यावर आलेला धोतराचा काचा, कमानदार

टोंकाचे पायातले चढाव—हा त्याचा वेश आणि आवेश पाहून खूप गर्दी जमा झाली होती. त्यानें, स्फुरण चढून आता तो दमदाटीवर आला होता.

—" अरे वारे सेट! सेट आवा कडू का! याद राख कसेविया, मार खान का हम कोई मरहाटी नोकर नाहि यह पठ्ठा रामरतन, इक बेर बिगडा तो फिर कच्चा खाई जाइब! रामजी की सौगद, बजरगजीकी सौगद, अजुध्याकी सौगद जरुर-जरुर बदला लेव कभी भुलिबा नहीं"

( अरे वारे मालक! लक्ष्यात ठेव केशव्या—मार खायला हा कोणी मराठी नोकर लागून गेला नाहीं-हा पठ्ठा रामरतन एकदा चिडला कीं मग कच्चा खाऊन टाकील रामाची शपथ-बजरगाची शपथ-अयोध्याजीकी शपथ . जरुर सूड येईन, कधीं विसरणार नाहीं"

शेवटीं पोलिसने येऊन गर्दी हटवली

आत केशवरावाच्या माजरीनें आक्रोश माडला होता मेलेल्या पिलाला चाटून ती उलटेपालटे करी त्याला पोटाशीं घेऊन, वेटोळें घालून बसे. पण पिण्याऐवजीं, मान टाकून ते बाजूला पडले म्हणजे ती पुन्हा मोठ्यानें रडवा सूर काढी त्याला उचलण्यासाठीं कोणी आले कीं ती वेडरपणें त्याच्या अगावर धावून जाई प्रत्यक्ष केशवरावाना तिनें पिलाला हात लावू दिला नाहीं शेवटीं अधार पडण्याच्या सुमाराला त्या पिलाला तोंडात धरून ती स्वतःच कुठेंतरी लाब निघून गेली. रात्रीं जेवण्याच्यावेळींही ती हजर नव्हती. त्यानतर कितीतरी वेळाने ती हळूच खिडकींतून आत आली

तिचें दुसरें पिलू आता खूप चपळ झालें होतें ते सैरभैर साऱ्या घरात फिरत असे त्याला अगदीं जवळ घेऊन बसावेसें मनीला वाटत असावें, पण ते कसले स्थिर रहायला? तें धडपड करून निसटून जाऊ लागलें कीं ती हळूच त्याच्या कानशिलावर पजाचा तडाका देई—कान धरून चावा घेई आणि पायानीं पोटाशीं दडपून धरी

साऱ्याची निजानिज होण्याच्या सुमारला तें पिलू आईच्या कुशींत झोपीं गेले. मनी भुकेजून, चोर पावलानीं सैपाकघरात गेली. पण आज तिचा घातवार होता कीं काय नकळे? कपाटाशीं विरजणासाठीं काढून ठेवलेल्या दुधाच्या पातेल्यात तिनें तोंड घातलें तोंच तिच्या कबरेंत पळीचा

जोरानें तडाखा बसला–आणि बाहेरच्या खोलीपर्यंत राधाबाईची गर्जना घुमली

—" बाई–बाई ! काय उच्छाद दिलाय् सटवीन ? घरभर तिच मेल पिलू पायात घोटाळत, अन् ही बया बघावी तर अशी चोरटी. घरात रहायची सोय राहिली नाहीं माणसाना माजरच घेऊन रहा म्हणाव इकडे चागला भैय्या होता वसुलीला तो घालवला या माजराच्या पायीं इकडे तर अगदीं शभुमहादेव असायच !—उधारीन दिवाळ निघायची वेळ आली तरी कुणाला उणदुण बोलायला व्हायच नाहीं भैय्याच्या धाकान तरी येत होते पैसे वेळच्या वेळीं आता आवडत्या माजरीला मारल म्हणून माझ्यावरसुद्धा एवढाला डोळा करायच होईल ! अहाहा ! काय मेलीचा कैवार तरी ? माणसाऐवजीं मीही असल्या माजरीच्या जल्माला गेले असतें तरी बर झाल असत—म्हणजे तरी जरा जास्त किंमत राहिली असती माझी "

एक ना दोन ! हजार तोंड केल त्यानीं. त्यात कळस म्हणजे केशवरावानीं स्वतः आत जाऊन एका बशींत मनीला दूध ओतून दिले घरच्या राणीचा हा धडधडीत अपमान होता–आणि तोही एका माजरीच्या पायीं–कस सहन व्हाव हे त्याना ? त्यानीं आपले निर्वाणीचें शस्त्र बाहेर काढलें. तणतणत आत जाऊन, आपली गादी शेजघरातून उचलून त्यानीं ती माजघरातल्या कोंपऱ्यात आणून आपटली

त्याचे नाक लाल झालें होते डोळे, पाण्याने भरले होते—फुसफुसत त्या म्हणाल्या " फार गय केली मेलीची आता एक ती तरी नाहीं घरात, नाहीं तर मी तरी नाहीं जगावेगळच बघितल हे वेड " म्हणून रुसून त्यानीं पाघरुणात दडी मारली

केशवरावाना फार वाईट वाटले हा त्रागा पाहून मनाचा निर्धार करून, पत्नीच्या मर्जीप्रमाणे वागावें, मनीला आणि तिच्या पिलाला बाहेर हाकून द्यावें असा विचारही त्यानीं केला पण पुन्हा ते दीनवाणे, हिरवे हिरवे डोळे रोखून, पायाशीं अग घासून मनीनें ' म्याऽऽऽ ' असा लाडाचा आवाज केला कीं त्याचा निश्चय लटपटे. त्यानीं कोंपऱ्यात

निजलेल्या पिलाकडे पाहिले. नाकाचा लाल भडक शेंडा मागच्या दोन पायात दडवून अगाचें चक्र करून तें शातपणें झोपीं गेलें होतें

खिडकीबाहेरच्या अधारातून एका बोक्याचा ‘मॅऽऽऑव्’ असा कर्कश, खरखरीत अवाज येत होता असे गलेलठ्ठ बोके लहान लुसलुशीत पिलाना खाउन टाकतात असें केशवरावानीं ऐकले होतें या दोन जीवाना आता घराबाहेर हाकून दिलें तर? इकडे तिकडे धावताना हें पिलू त्या बोक्याच्या तावडींत खास सापडणार एका पिलाची वासलात रामरतननें लावली, अन् इतकी माया लावलेलें हें दुसर पिलू आपण बाहेर काढून त्याचीही वासलात लावणार?—त्याचे अग शहारले

ते अस्वस्थपणे आरामखुर्चीवर पडले समोरच्या भिंतीवर, घड्याळाखालीं त्याच्या तान्ह्या मृतपुत्राचें छायाचित्र टागलें होते त्याच्या लीलाची स्मृति त्याच्या मनात जागृत होऊ लागली या पिलासारखेच त्याचे काळेभोर हसरे डोळे, इवल्याशा लालसर मुठी, इकडे तिकडे पाय आपटण्याने वाजणाऱ्या त्याच्या पायातल्या घागऱ्या—अन् शेवटीं एकाएकीं झालेल्या आजारात, वेदनानीं असहाय झालेल्या—भेदरलेल्या डोळ्यानीं आपल्याकडे पाहून, आपल्या माडीवरच झटका देऊन सोडलेला प्राण—त्याच्या पत्नीने फोडलला हबरडा—हीं सारीं चित्र त्याचा हळुवार, भावनाकुल, मनचक्षू समोरून भराभर जाऊ लागलीं ..

घड्याळात अकराचे ठोके पडले काही आवेग येऊन, त्यानीं कोंपऱ्यातले ते पिलू अलगद उचलून आपल्या बिछान्यावर ठेवले जरा चळवळ करून त्यानें कू—कू असा आवाज केला—झोंपेतच पिण्यासाठीं त्याचे ओंठ अपोआप पुढेंमागे झाले मउ बिछान्याच्या उबेत, अगाचा मुटकुळा करून तें पुन्हा झोंपी गेले एक निश्वास सोडून केशवरावानीं अथरुणावर अग टाकलें दिवा विझविला अगावर ओढून घेतलेल्या पाढऱ्या लोंकरी ब्लॅकेटावर, पायाशीं पडलेल्या भारामुळे मनीही तेथेच येऊन निजल्याचें त्याना कळले आपले तृप्त आणि सुखावलेले डोळे मिटून तिने मदपणे घुरघुरण्याचे सत्र सुरू केले होते

त्या रात्रीं केशवरावाना स्वस्थ झोंप आली नाहीं अगदीं विचित्र

स्वप्नें त्याना दिसत होतीं क्षणात पाळण्यातले आपलें मूल त्याना दिसे, तर दुसऱ्या क्षणाला त्या पाळण्यात मुलाऐवजीं ते मनीचे पिलू त्याना दिसू लागे रामरतनच्या पिंजारलेल्या मिशा, लाल डोळे आणि उगारलेला दडाही सर्वच त्याना दिसू लागे यातच कुठूनसे खडखड, धडधड असे आवाज त्याना ऐकू येऊ लागले सर्वच अगदीं गार वाऱ्याचा झोत अगावर येऊन ते शहारून जागे झाले

त्याच्या पायथ्याशीं असलेली, लोटलेली लाकडी खिडकी हळूहळू उघडत होती तोंडाला काळें फडके गुडाळलेला एक राकट चेहरा आत डोकावत होता खिडकींतून आत आलेल्या मद चादण्यात तो काळा कभिन्न देह त्याना एखाद्या भूतासारखा वाटला त्याची बोबडीच वळली एकदम उडी मारून अथरुणावरून उठावें, असा निश्चय करूनही त्याना जागेवरून हलता येईना लोखडी साखळ्यानीं पलगाला जखडल्यागत त्याना वाटू लागलें

तेवढ्यात तो काळा देह खिडकी उघडून, उडी मारून तिच्या काठाशीं येऊन बसला त्यानें काळें फडकें तोंडावरून दूर केलें

तो रामरतनच होता !

दात खाऊन तो म्हणाला—" साले ! ले अब राम का नाम ! हमारे मुह लगकर कोइ का बचि है ? अरे हम तो पाच बरस जेल भोग आइन है—हम को डर काहींका ? मरिहो पर टरिहो नाहिं. अब जानसे मार डारिब, फिर जो हुइ है सो हुइ है. " ( साल्या, घे आता रामाच नाव ! माझ्या वाटेला जाउन कोण वाचला आहे ? अरे मी तर पाच वर्षे तुरुगात खडी फोडून आलों आहे—मला भीती कसली ? मरीन पण हलणार नाहीं इथून. आधीं तुला जिवानिशीं मारतों-मग जें होईल तें होऊ दे )

कबरेचा चाकू काढून त्यानें खिडकींतून खालीं, केशवरावाच्या पलगावर उडी घेतली

एक किंकाळी फोडून, केशवरावानीं डोळे घट्ट मिटून घेतले...... इतक्यात धाडकन् एक आवाज आला. त्यानीं डोळे उघडले तों पलगा-

वर उडी घेतलेला रामरतन खालीं फरशीवर, थेट तोंडावर कोसळला असून त्याच्या नाकातोंडातून भळभळ रक्त वाहत होतें एका क्षणाचा सारा प्रकार पलंगावर आवेशाने उडी घेतली असता पाढऱ्या लोंकरी ब्लॅकेटावर झोंपलेल्या मनीच्या मउ अंगावर रामरतनचा पाय पडून घसरला—त्या अवसानाच्या जोरातच तोल जाऊन तो जोराने तोंडावर कोसळला होता पाढरें केंसाळ ब्लॅकेट, पाढऱ्या शुभ्र केंसाचें माजर, आणि पाढरा, मंद, चद्रप्रकाश याचा एक जीव होऊन पाय पडेपर्यंत रामरतनला काहीं कळले नाहीं

तिरिमिरी येऊन तो खाली कोसळल्यावर मात्र केशवरावाना धीर येऊन ते उडी मारून उठले आणि त्याच्या मानगुटीवर गुढगा रोवून बसले रामरतनच्या लाब शेंडीचे चागले वर्म त्याच्या हातात सापडले होते. मुक्या मनीनेंही आपल्या पिलाला मारणाऱ्या या इसमाला ओळखलें होते. अगदीं पिसाळून लचके तोडून, ओरबाडून, त्याच्या दोन्हीं पोटऱ्याचीं तिनें चाळणी करून टाकली होती

आतली आरडाओरड ऐकून बाहेर केशवरावाची पत्नीही किंचाळू लागली वाड्यात पटापट दिवे लागले 'काय झाल-काय झाल?—दार उघडा दार!' म्हणून इतर बिऱ्हाडकरू बाहेरच्या दारावर धक्के देऊ लागले राधाबाईनीं उघडलेल्या दारातून माणसाची गर्दी आत शिरली. फुटलेलें तोंड आणि रक्तबबाळ पोटऱ्या अशा स्थितींत रामरतनला अजून 'स्वारी भरून' केशवरावानीं धरून ठेवलें होतें तें पाहून साऱ्याना शौर्य चढलें काथ्याच्या, सुतळीच्या दोऱ्या आणून साऱ्यानीं रामरतनला खांबाशीं करकचून बाधून टाकलें दोन बिऱ्हाडकरू स्वयसेवक पोलीसचौकीकडे रवाना झाले इतर सारे खालीं बसून या प्रकाराची रसभरित चर्चा करण्यात मग्न झाले

—"बाकी केशवरावाचीही बहादुरी खरी बर बाई! कसला अरिष्ट पुरभय्या! पण कसा पालथा घातला बाई" बायका किलबिलत होत्या.

केशवरावाच्या दुकानावर बरीच बाकी थकलेले एक कुटुंबवत्सल

त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणाले–" बाकी केशवराव तुम्ही खास माग आखाड्यात कुस्त्या मारल्या असल्या पाहिजेत. भारी खोल तुम्ही बोवा— पत्ता लागू दिला नाहीं आम्हाला बस! वाड्याच्या वतीन आम्ही सारे जाहीर सत्कार करणार तुमचा!"

एक म्हाताऱ्या आजी पुढे होऊन राधाबाईवरून हात ओंवाळून म्हणाल्या—" राधाबाईंच कुंकू बळकट बर! काळ आला पण वेळ नाहीं आली म्हणतात ती यालाच–अन् राधाबाई, तुम्ही हसत होता—रागावत होता तुमच्या यजमानाच्या माजरीच्या मायेबद्दल नाहीं? मुकी जनावरही इमानाला जागतात बर! केशवरावानीं इतका जीव लावला म्हणून ती माजरी त्याच्या पांघरुणावर झोंपली जवळ, अन् धावली या मेल्या घटिंग-णाच्या अंगावर–कशी चाळणी केलीय् मेल्याच्या पायाची—माया नसली तर कध्धीं माणसाच्या अंगचाटीला राहायची नाहींत माजर!

दुसरी म्हातारी डोळे पुशीत म्हणाली–त्या मनीच्या पिलाची इतकी काळजी घेतली केशवरावानीं म्हणून उपकार फेडलेन तिन माजरीचा का होईना, लेकुरवाळ्या जीवाचा आशीर्वाद आहे तुम्हाला देव करो–अन् तुमचाही पाळणा लवकर हालता होवो—!

साऱ्याची अशी बडबड चालली असता स्वस्थपणें, पिलाला जवळ घेऊन, त्याच्याभोंवनीं अंगाचें वर्तुळ करून मनी बिछान्यावर बेफिकिरीनें झोंपी गेली होती!

---

# व्यावहारिक ज्ञानकोश

**सह्याद्रि मासिकाच्या आकाराचीं २००० पृष्ठें**

**एकूण भाग ५**

**मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड या शाळाखात्यांनीं विद्यार्थ्यांकरितां व वाचनालयाकरितां मंजूर केला आहे**

आतांपर्यंत निघालेल्या सर्व कोशांत—माहिती, चित्रें, कागद, छपाई व किंमत वगैरे दृष्टीनें पाहतां-हाच कोश अद्यावत् व सग्राह्य आहे थोडक्यांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, **प्रत्येक कुटुम्बांत, प्रत्येक शाळेंत** आणि **प्रत्येक वाचनालयांत हा कोश असलाच पाहिजे.**

- **६० पृष्ठांचे सचित्र माहितीपत्रक मोफत पाठवूं**
- **सेट्स् फारच थोडे शिल्लक आहेत.**
- **हप्त्याच्या आकर्षक अटी**
- **रोखीनें घेणारास खास सवलत.**

**सोल अेजण्टस् :—**

## स्कूल ॲण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

# आमचीं कांहीं पुस्तकें

## कादम्बरी

रिकामा देव्हारा — खाडेकर
सुखाचा शोध — ,,
काश्मिरी गुलाब — प्रो. फडके
कुलाब्याची दाडी — ,,
दौलत — ,,
जादूगार — ,,
प्रवासी — ,,
दौलत (संक्षिप्त) — ,,
दिव्य चक्षु — कु. रत्नप्रभा रणदिवे
आंधळा न्याय — वि. वा. पत्की
समरांगण — म. भा. भोसले

## लघुकथा

दत्तक व इतर गोष्टी — खाडेकर
विद्युत्प्रकाश — ,,
पाकळ्या (२री आवृत्ति) — ,,
गोष्टी भाग १ ला — प्रो. फडके
गोष्टी भाग २ रा — ,,
परिस व लोखंड — श. गो. गोखले
कोवळीं किरणे — दि. द. पाटील

## काव्य

भिकारीण — मंगसुळीकर
जीवन प्रभा — द. दा. पेंडसे
फुलांची बाग (सचित्र) — वासुदेवाग्रज

## संस्कृत

बलिदानम् — लाटकरशास्त्री
श्रीशाहुचरितम् — लाटकरशास्त्री

## नाटकें व नाटिका

संजीवन — प्रो. फडके
तोतया नाटककार — ,,
जडावाची देवी — ,,
आगलावी — ,,
क्षमेसाठीं अपराध — ,,

## टीका, विनोद व चर्चा

वनभोजन — खाडेकर
घुंघुर्मास — ,,
वाङ्मय-विलास — माडखोलकर
प्रतिभासाधन — प्रो. फडके
साहित्य आणि संसार — ,,
मानसमंदीर — ,,
मनोहरची आकाशवाणी — ,,
वाङ्मय-विहार — ,,
गलोल — शामराव ओक
स्वल्पविराम — र. कृ. फडके
कागदी होड्या — बा. भ. बोरकर
खाडेकर-चरित्र आणि वाङ्मय — प्रो. मा. का. देशपांडे

## इतर

बुद्धिबळ-क्रीडारत्न — हळदीकर
अभिनयकला — मिरजकर
पाळ्यांचे खेळ (सचित्र) — नेरूरकर
लघुरत्नपरीक्षा — म. ल. खाबेटे

दा. ना. मोघे, बी. ए., कोल्हापूर.